


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

ISSN 2456-656X

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

ऑक्टोबर ते डिसेंबर २०१७



९१व्या अखिल भारतीय
मराठी साहित्य
संमेलनाचे अध्यक्ष

## लक्ष्मीकांत देशमुख

अनुक्रमणिका



# क्षणचित्रे




महाराष्ट्र साहित्य परिषद आणि अक्षरधारा बुक गॅलरी यांच्या संयुक्त विद्यमाने कविवर्य विंदा करंदीकर यांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने आयोजित 'देणाऱ्याने देत जावे' या कार्यक्रमात अभिवाचन करताना ज्येष्ठ अभिनेते डॉ. गिरीश ओक, अनुराधा मराठे आणि डॉ. वंदना बोकील. या कार्यक्रमासाठी संहिता लेखन डॉ. अरुणा ढेरे यांनी केले होते.



महाराष्ट्र साहित्य परिषदेचे विभागीय साहित्य संमेलन सावेडी उपनगर शाखेच्या वतीने नगर येथे आयोजित करण्यात आले होते. डॉ. रंगनाथ पठारे यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झालेल्या या संमेलनाचे उद्घाटन करताना रामदास फुटाणे, सोबत स्वागताध्यक्ष नरेंद्र फिरोदिया आणि मान्यवर.



महाराष्ट्र साहित्य परिषद, शाहुपुरी शाखा सातारा आणि छत्रपती शिवाजी कॉलेज, सातारा यांच्या संयुक्त विद्यमाने आयोजित समीक्षा संमेलन डॉ. हरिश्चंद्र थोरात यांच्या अध्यक्षतेखाली आयोजित करण्यात आले होते. या संमेलनाचे उद्घाटन करताना माजी संमेलनाध्यक्ष डॉ. नागनाथ कोत्तापल्ले, रयत शिक्षण संस्थेचे चेअरमन अनिल पाटील आणि मान्यवर.

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. ३६१, ऑक्टोबर-डिसेंबर २०१७



संपादक

**डॉ. पुरुषोत्तम काळे**



संपादन समिती

**डॉ. मनोहर जाधव । डॉ. नीलिमा गुंडी । डॉ. भास्कर ढोके**
**डॉ. रणधीर शिंदे । डॉ. वर्षा तोडमल । डॉ. संदीप सांगळे**



प्रकाशक

**प्रकाश पायगुडे**

प्रमुख कार्यवाह




**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११०३०. दूरभाष : ०२०-२४४७५९६३
संकेतस्थळ : www.masapapune.org
ई-मेल : masaparishad@gmail.com
(कार्यालयाची वेळ : स. ९.३० ते १२, दु. ४.३० ते रा. ८)




मुद्रक-प्रकाशक
**प्रकाश पायगुडे**
प्रमुख कार्यवाह
महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे ४११०३०.

जाहिरात व्यवस्थापक
**शिरीष चिटणीस**
७५८८८६५०५१

संपादकीय संयोजन
**संदीप खाडे**

अक्षरजुळणी व सजावट
**आर्ट ॲडव्हर्टायझिंग**

मुखपृष्ठ
**जयदीप कडू**

मुद्रितशोधन
**अनुश्री भागवत**

मुद्रणस्थळ
**एस.ए. प्रिंटर्स, एल.एल.पी.**
फ्लॅट नं.५, ३रा मजला,
सिद्धीविनायक अपा.,
शिवदर्शन, पुणे ४११००९.

मूल्य : १५ रुपये

प्रकाशन क्र. ३६१
ऑक्टोबर-डिसेंबर २०१७



# अं|त|रं|ग
















संपादकीय

**डॉ. पुरुषोत्तम काळे**

# अ.भा.साहित्य संमेलनाने वाचन संस्कृती वाढीस लागावी!

हाराष्ट्र साहित्य पत्रिकेचा ३६१व्या अंकाचे संपादकीय लिहीत असताना अ.भा. मराठी साहित्य संमेलनाध्यक्षपदी मा. लक्ष्मीकांत देशमुख यांची निवड झाल्याची बातमी येतेय. मा. लक्ष्मीकांत देशमुख यांचे हार्दिक अभिनंदन! या संमेलनाध्यक्षपदाच्या निवडणुकीमध्ये निवडणूक लढवित असणारे सारेच उमेदवार आपणच या पदासाठी कसे योग्य आहोत, हे हिरिरीने सांगत होते. महाराष्ट्रातील आणि बृहन्महाराष्ट्रातील बहुसंख्य मतदारांनी आपला कौल मा. देशमुखांच्या पारड्यात टाकला. या निवडणुकीच्या निमित्ताने सर्व उमेदवारांनी मराठी साहित्यसंस्कृती आणि साहित्यव्यवहारासंबंधीची आपापली मते व्यक्त केली. निवडणुकीमध्ये कोणातरी एकाचाच विजय होतो. इतरांचा पराभव झाला म्हणजे त्यांची साहित्य कारकीर्द कमी दर्जाची आहे, असे नाही.

निवृत्त सनदी अधिकारी असलेले लक्ष्मीकांत देशमुख हे उत्तम लेखक आहेत. प्रशासकीय अधिकारी म्हणून काम करताना समाजाच्या सर्वच स्तरांशी त्यांचा संपर्क आला. संवेदनशील वृत्तीने टिपलेले अनुभव देशमुखांनी साहित्यातून मांडले. 'प्रशासननामा' आणि 'बखर प्रशासनाची' या पुस्तकांमधून त्यांनी राज्यकर्ते आणि प्रशासन यांमधील ताण चित्रित केले आहेत. 'हरवलेले दिवस' या कादंबरीतून त्यांनी बालमजुरांच्या शोषणाला वाचा फोडली आहे. 'इन्किलाब विरुद्ध जिहाद' या साडेनऊशे पृष्ठांच्या दीर्घ कादंबरीतून अफगाणिस्तानातील पन्नास वर्षांच्या राजकीय वाटचालीचा आलेख देशमुखांनी मांडला. अफगाणिस्तानातील क्रांती विरुद्ध धर्मयुद्ध हा संघर्ष त्यांनी कष्टपूर्वक आणि व्यासंगी रीतीने मांडला आहे. 'सावित्रीच्या गर्भात मारलेल्या लेकी' या कथासंग्रहातून स्त्रीभ्रूणहत्येविषयीचा ज्वलंत सामाजिक प्रश्न देशमुख मांडतात. कथा-कादंबरीकार असलेल्या लक्ष्मीकांत देशमुखांनी रिपोर्ताज पद्धतीचे लेखनही केले आहे. देशमुखांच्या साहित्याचा आढावा घेणारा लेख या अंकात रणधीर शिंदे यांनी लिहिला आहे. मा. लक्ष्मीकांत देशमुखांच्या अध्यक्षीय कारकिर्दीस शुभेच्छा!

अ. भा. मराठी साहित्य संमेलनामुळे वाचन संस्कृती वाढीस लागावी ही अपेक्षा आहे. सर्व कार्यक्रमांतून आणि चर्चांमधून मराठी ग्रंथव्यवहार कसा



वाढीस लागेल या दृष्टीने आयोजन झाले पाहिजे. सध्या पुस्तकांची दुकाने महानगरांमधून कमी होत आहेत. या पार्श्वभूमीवर काही प्रकाशन संस्था साहित्यविषयक चर्चा, मान्यवर लेखकांच्या मुलाखती आयोजित करून रसिकांची साहित्यविषयक जाण वाढवित आहेत. 'अक्षरधारा'तर्फे घेतले जाणारे कार्यक्रम आणि 'मॅजेस्टिक गप्पा' ही काही प्रातिनिधिक उदाहरणे. समीक्षक आणि लेखक म्हणून परिचित असलेले संजय भास्कर जोशी यांनी 'पुस्तकपेठ' या नावाचे ग्रंथविक्रीकेंद्र काढून ग्रंथव्यवहारास वैयक्तिक प्रयत्नांनी चालना दिली आहे. रसिकांना काय वाचावे, याबाबत ते मार्गदर्शन करतात. असे प्रयत्न महाराष्ट्रात सर्वदूर व्हावेत. श्री. जोशी यांनी नुकतीच पुस्तकपेठेची शाखा नाशिक येथे सुरू केली आहे. त्याचप्रमाणे ते 'साहित्यसूची' या नियतकालिकाचे संपादक झाले आहेत. या दोन्ही उपक्रमांस शुभेच्छा!

दिवाळी अंक आणि मराठी साहित्यव्यवहार यांचे अतूट असे नाते आहे. अनेक नवोदित आणि ख्यातकीर्त लेखक दिवाळी अंकांमध्ये लिहीत असतात. वेगवेगळ्या विषयांवरील दिवाळी अंक वाचकांना वाचनाचा आनंद देतात. मराठी संस्कृतीत असलेली दिवाळी अंकांची परंपरा १०० वर्षांहूनही अधिक काळ साहित्यव्यवहारास समृद्ध करीत आहे. प्रकाशनसंस्थांचे दर्जेदार दिवाळी अंक, नियतकालिकांचे दिवाळी अंक अनेक नवोदित लेखकांचे साहित्य प्रकाशित करतात. 'अक्षरलिपी' या यावर्षी प्रथमच प्रकाशित झालेल्या दिवाळी अंकाचे स्वागत रसिकांनी केले. महेंद्र मुंजाळ, प्रतीक पुरी आणि शर्मिष्ठा भोसले या संपादकत्रयींनी हा अंक प्रकाशित करण्यासाठी जे कष्ट घेतले आहेत, ते अंक वाचताना जाणवतात. या अंकाप्रमाणेच 'पुणे पोस्ट', 'संस्कृती', 'अक्षरपेरणी'चा 'किशोर सानप समीक्षा विशेषांक', 'वाघूर' हे दिवाळी अंक उल्लेखनीय आहेत. मनोहर सोनवणे, प्रदीप खेतमर, बाळासाहेब घोंगडे, सुनिताराजे पवार आणि नामदेव कोळी या संपादकांचे अभिनंदन आणि भावी वाटचालीसाठी शुभेच्छा!

माजी संमेलनाध्यक्ष अरुण साधू आणि लेखक, पत्रकार ह. मो. मराठे यांचे काही काळापूर्वी निधन झाले. म.सा. पत्रिका आणि परिषदेतर्फे या साहित्यिकांना भावपूर्ण आदरांजली!

या अंकामध्ये अरुण साधू आणि ह. मो. मराठे यांच्या कर्तृत्वाचा आढावा घेणारे, श्रद्धांजलीपर लेख घेतले आहेत. नगर येथे म.सा. परिषदेचे विभागीय साहित्य संमेलन झाले. या संमेलनाचे अध्यक्ष रंगनाथ पठारे यांनी समकालीन वास्तवाचा घेतलेला भेदक वेध चिंतनीय आहे. सातारा येथे म.सा. परिषदेचे समीक्षा संमेलन झाले. समीक्षा संमेलनाचे अध्यक्ष हरिश्चंद्र थोरात यांनी मराठी समीक्षाव्यवहाराविषयी व्यक्त केलेले विचार मराठी समीक्षेच्या पुढील वाटचालीस दिशा देणारे आहेत. ज्ञानक्षेत्रांची होणारी सरमिसळ आणि सिद्धान्तव्यूहांचे कोसळणे ही त्यांची निरीक्षणे मार्मिक आहेत. या दोन्ही संमेलनांचे आयोजन सुव्यवस्थित आणि नेटके होते. म.सा.प. नगरचे श्री. फिरोदिया, श्री. येलुरकर आणि म.सा.प. शाहुपुरीचे अध्यक्ष श्री. विनोद कुलकर्णी तसेच रयत शिक्षण संस्था, साताराचे सचिव श्री. अनिल पाटील यांचे अभिनंदन.

गेल्या अंकात मराठीला अभिजात भाषेचा दर्जा कधी मिळणार, हा प्रश्न आम्ही उपस्थित केला होता. अजूनही याबाबतचा निर्णय झालेला नाही, ही खेदाची बाब आहे. जानेवारी महिन्यात म.सा.प.चे कार्याध्यक्ष मिलिंद जोशी, म.सा.प.शाहुपुरी शाखेचे अध्यक्ष विनोद कुलकर्णी यांच्या नेतृत्वाखाली दिल्लीत धरणे आंदोलन केले जाणार आहे. सर्व मराठी भाषिक जनतेने या आंदोलनात सहभाग घ्यावा, पाठिंबा द्यावा आणि अभिजात भाषेच्या दर्जासाठी सरकारवर दबाव आणावा, हे आवाहन यानिमित्ताने आम्ही करीत आहोत.

◆

**डॉ. पुरुषोत्तम काळे**
चलभाष : ९४०४९३७७१०
purushottamdkale@gmail.com

(टीप : हा अंक मसापच्या www.masapapune.org या संकेतस्थळावर तसेच डेलीहंट या मोबाइल ॲपवरही उपलब्ध आहे.)












श्रद्धांजली

रविप्रकाश कुलकर्णी

# चौकटीबाहेरचा लेखक : अरुण साधू



**'मुंबई दिनांक' ही अरुण साधूंची पहिली कादंबरी. अवाढव्य मुंबईचा त्यांनी विविध व्यक्तिरेखांच्या अनुषंगाने जो वेध घेतला, तसा तो यापूर्वी कोणीच घेतलेला नव्हता. राजकारण, सत्तास्पर्धा, स्मगलिंग, मध्यमवर्ग आणि त्यांचं जीवन, त्यांचा हव्यास, कामगारांचं बकाल आयुष्य ह्या सगळ्यांची सरमिसळ आणि त्यातून उभं राहिलेलं जग वाचकांना स्तिमित करून गेलं... ...सामाजिक जीवनातील ताणे-बाणे प्रत्यक्ष-अप्रत्यक्षपणे राजकारणाशी कसे जोडलेले असतात हे 'मुंबई, दिनांक'मध्ये दिसलं आणि एका नव्या राजकीय कादंबरीची दिशा साधूंनी स्पष्ट केली!**



लेखक म्हटलं की तो चारचौघांसारखा नसतोच. असला तरी चालण्या-बोलण्यात त्याचे वेगळेपण येतेच, निदान ते जाणवण्याचा प्रयत्न तरी कधी कधी तो करतोच. 'मी लेखक असल्याची' सूक्ष्म अहंता त्यात असते. त्यात पुन्हा तो लेखक प्रथितयश, पुरस्कारप्राप्त वगैरे असला तर मग काही विचारूच नका. दुसऱ्याचे लक्ष वेधण्याची कला त्याला सहज प्राप्त झालेली असते. ही झाली सहज लक्षणं. सूक्ष्म लक्षणं तर सांगावी तेवढी कमीच. आठवून पाहा तुमच्या जवळपास असणारे साहित्यिक... अर्थात, ह्याला अपवाद असणारे पण लोक आहेतच, असतातच... त्यात ज्यांचा पहिला नंबर लावता येईल ते म्हणजे अरुण साधू!

ज्या काळात साऱ्या जगात वेगवेगळ्या चळवळीचा जणू उद्रेक झाला होता. त्यात तरुणांचे रोल मॉडेल फिडेल कॅस्ट्रो आणि चे गेव्हेरा होते. त्यांची हकीगत अरुण साधू यांनी 'माणूस' साप्ताहिकातून सांगायला सुरुवात केली आणि वाचकांना, विशेषतः तरुणांना ती विलक्षण आवडली. लेखक म्हणून लोकप्रियतेची चव अरुण साधू यांनी चाखली ती पहिल्यांदा इथे!

त्यावेळचे लेंगा-बुशशर्टमधले साधू पुणं सोडून मुंबईत आले. 'मुंबई दिनांक'सारखी प्रत्ययदर्शी कादंबरी त्यांनी लिहिली. कादंबरीतून त्यांनी जी मुंबई दाखवली आणि त्याचबरोबर तिथे राबणारी माणसं, त्यांचं जगणं, त्यांचं राजकारण... हे सर्व प्रथमच साहित्यात येत होतं. वाचकांच्या मनाने त्याची विलक्षण पकड घेतली. नव्हे, अरुण साधू म्हणजे मुंबई दिनांक हे समीकरण होऊन गेलं. अनेक भाषांत ती गेली, पण अरुण साधू त्याबाबत इतके तटस्थ असत की, जणू ही कादंबरी दुसऱ्याच कुणी तरी लिहिली असावी.

हा साधेपणा साधूंचा विशेष होता आणि तो कायम राहिला.

दिनकर गांगल आणि साधूंची मैत्री पार पुण्यापासूनची. ती पुढे मुंबईतही टिकली, नव्हे, ग्रंथालीच्या निमित्ताने वर्धिष्णु झाली. जणू काही गांगल-साधू कुटुंब एकच...



तर अशा अरुण साधूंना दिनकर गांगल यांच्या पत्नी अनुराधा गांगल म्हणाल्या, ''काय साधू, काय ते तुमचे फिडेल, चे आणि क्रांती काय, नाहीतर ड्रॅगन झाला काय अशी काय लिहिलीत? जरा चांगलं लिहा नां...'' याचं कारण अनुराधाबाईंना त्या पुस्तकांचा मोठेपणा माहीतच नव्हता. गांगलांकडूनदेखील कळला नसावा. अशा वेळी एखाद्या लेखकाची काय प्रतिक्रिया झाली असती, हे सहज समजण्यासारखं आहे. निदान त्याच्या चेहऱ्यावर नाराजीची आठी नक्कीच उमटली असती. पण अरुण साधू नुसते हसले, तेदेखील गालातल्या गालात

ही आठवण खुद्द अनुराधा गांगल यांनीच सांगितली आहे म्हणून विश्वास ठेवायचा!

'मुंबई दिनांक' ही अरुण साधूंची पहिली कादंबरी. अवाढव्य मुंबईचा त्यांनी विविध व्यक्तिरेखांच्या अनुषंगाने जो वेध घेतला, तसा तो यापूर्वी कोणीच घेतलेला नव्हता. राजकारण, सत्तास्पर्धा, स्मगलिंग, मध्यमवर्ग आणि त्याचं जीवन, त्यांचा हव्यास, कामगारांचं बकाल आयुष्य ह्या सगळ्याची सरमिसळ आणि त्यातून उभं राहिलेलं जग वाचकांना स्तिमित करून गेलं. यातील पात्रं- किशोर वझे, दयानंद, डी-कास्टा आणि जिवाजीराव शिंदे या वेगवेगळ्या व्यक्तिमत्त्वांचं जगणं अरुण साधूंनी एका सूत्रात मांडलं. त्या पाच माणसांच्या आयुष्यातला एक दिवस आणि एक रात्र यात येतं ते उभं केलेलं जग म्हणजे 'मुंबई दिनांक'. सामाजिक जीवनातील ताणे-बाणे प्रत्यक्ष-अप्रत्यक्षपणे राजकारणाशी कसे जोडलेले असतात, हे 'मुंबई दिनांक'मध्ये दिसलं आणि एका नव्या राजकीय कादंबरीची दिशा साधूंनी स्पष्ट केली!

'मुंबई दिनांक' नंतर साधूंची कादंबरी आली ती 'सिंहासन', जे साधूंचं राजकीय कादंबरीचं पुढचं पाऊल ठरलं. महाराष्ट्राच्या सत्ताकारणाची, प्रत्यक्ष विधिमंडळातील बलाबलाची जाण आणि मग मुख्यमंत्रीपदासाठी रचलेला व्यूह, नव्या शह-काटशहाचा खेळ, फुटीर राजकारण या सगळ्यांचं एक बेरकी चित्र म्हणजे साधूंची 'सिंहासन'.

हे सत्ताचक्र केवळ महाराष्ट्राचं चित्रं नव्हतं, तर कुठल्याही लोकशाही राज्यात हे घडू शकतं- घडतं. त्यामुळे 'सिंहासन' कादंबरीचं सार्वकालिक महत्त्व ठरलं.

अरुण साधू पत्रकार म्हणून आणि कादंबरीकार म्हणून किती अव्वल आहेत, हे 'सिंहासन'ने दाखवून दिलं. 'सिंहासन'मधला सडाफटिंग वार्ताहर दिगू टिपणीस काय पाहतो आणि काय टिपतो, ह्यावरून अरुण साधूंच्या पत्रकारितेची जाण कळावी... आणि 'सिंहासन' वाचल्यानंतर साधूंचं कलात्मक भान किती अव्वल आहे, हे लक्षात येतं.

एक लेखक म्हणून 'मुंबई दिनांक' आणि 'सिंहासन' या दोन कादंबऱ्यांनी अरुण साधूंना जे स्थान मिळालं, ते कायम राहिलं- राहील.

किंबहुना, असंही म्हणता येईल की, 'शोधयात्रा' आणि विशेषतः 'मुखवटा' ह्या दोन कादंबऱ्यांतून अरुण साधू एका वेगळ्या वाटेने शोध घेऊ पाहत आहेत, असं जाणवतं. पण त्याची हवी तशी मीमांसा झाली नाही. त्याचं कारण काय असेल?

'मुंबई दिनांक' आणि 'सिंहासन'च्या यशाची छाया, गडद झाली ती जब्बार पटेल दिग्दर्शित 'सिंहासन' चित्रपटामुळे. ह्या दोन कादंबऱ्या मिळून एक चित्रपट होऊ शकतो हे एखाद्या प्रतिभावंत दिग्दर्शकालाच सुचू शकतं. हे करताना खुद्द अरुण साधूंना तरी त्याची खात्री कुठे होती? जेव्हा जब्बार ही कल्पना घेऊन साधूंकडे गेले, तेव्हा साधू म्हणाले, ''तू गंमत करतो आहेस, मला माहीत आहे, पण हे शक्य नाही, तरी विचार करतो.''

पण विचारांती साधूंना लक्षात आलं की, हे काम आपलं नव्हे; पण त्याचवेळेला त्यांनी हे पण सांगितलं की, हे काम विजय तेंडुलकर करू शकतात.

अरुण साधूंची जाण-नजर ही अशी होती. मग, विजय तेंडुलकरांनी जणू एक नवंच जग 'सिंहासन' चित्रपटात उभं केलं. 'मुंबई दिनांक' आणि 'सिंहासन'मध्ये लपलेली आणि कथा पुढे नेणारी गोष्ट आहे ती. चित्रपटाच्या सुरुवातीलाच दृश्य आहे- मुख्यमंत्र्यांना फोन येतो- ''तुमच्या राज्याला धोका आहे...'' ह्या एका वाक्यावर संपूर्ण चित्रपट उभा राहतो. मुख्यमंत्री आणि अर्थमंत्री यांच्यातली ही सत्तेची साठमारी..! विजय तेंडुलकरांचे पटकथा-संवाद. तेंडुलकरांच्या कलावंताला दाद द्यावी तितकी कमीच. अर्थात, चित्रपट गाजला. आजही तो आवडतो. अर्थात, त्यामुळे 'मुंबई दिनांक' आणि 'सिंहासन' कादंबऱ्यांची मागणी वाढली. साधूंचं नाव दुमदुमलं...

कसं असतं पाहा. चित्रपटाला यश मिळालं की, त्याचे वाटेकरी अनेक असतात-पुढे येतात. हा अनुभव अनेकदा दिसतो. 'सिंहासन' तर काय अरुण साधूंच्या बहुचर्चित कादंबरीवरच होता. 'सिंहासन'ची विजय तेंडुलकरांनी लिहिलेली पटकथा जब्बार पटेल यांनी अरुण साधूंकडून तपासून घेतली होती. त्यावर साधू म्हणाले, ''आता ही कथा माझी नाही. माझं फक्त कथाबीज आहे. हा तेंडुलकरांचा विचार आहे...''

अर्थात, तरीही अरुण साधू 'सिंहासन'च्या चित्रीकरणास बऱ्याचदा हजर होते. मंत्रालय आणि मंत्रालय परिसर उभं करून चित्रीकरण करणं वेळेअभावी आणि कदाचित आर्थिक कारणांमुळेदेखील शक्य नव्हतं, पण नियम डावलून शरद पवार यांनी थेट मंत्रालयातच चित्रीकरणाला परवानगी दिली आणि म्हटलं, ही गोष्ट तत्कालीन उपपंतप्रधान यशवंतराव चव्हाणांच्या कानावर घाला. कारण तेव्हा ते मुंबईतच होते. अर्थात, तसं करताच यशवंतराव म्हणाले, ''या चित्रपटाच्या कामात साधू तुमच्यासोबत आहेत का? त्यांचे मार्गदर्शन जरूर घ्या, कारण हे जग त्यांनी जवळून पाहिलं आहे. ते किती खरं आणि किती खोटं याची कल्पना त्याला आहे...'' अर्थात, बहुतांश चित्रीकरणाला साधू होतेच. त्या संबंधात जब्बार पटेल यांनी म्हटलं आहे, ''तो मोठाच आधार मला होता...''

'सिंहासन' चित्रपटासंबंधात हे सगळं सांगायचं कारण मात्र वेगळंच आहे. 'सिंहासन' चित्रपट लागला, तेव्हा साधू मंत्रालय बीटलाच होते. बुधवारी मंत्रिमंडळाच्या साप्ताहिक

बैठकीनंतर मुख्यमंत्री पत्रकार परिषद घेत असत. तेव्हा अर्थात, साधूदेखील होतेच. आल्या आल्या शरद पवार साधूंकडे पाहत म्हणाले, ''अरुण, अरे परवा तुझा 'सिंहासन' पिक्चर पाहिला...''

यावर अरुण साधू फक्त म्हणाले, ''अच्छा!'' फक्त दोन शब्द. विषय संपवून टाकला. एरवी मुख्यमंत्र्यांशी आपली किती घसट आहे हे दाखवायला भले भले काय काय आणि कुठेही कसं वागतात ह्याची किती तरी उदाहरणं आपण पाहतोच... अरुण साधूंचं हे वेगळेपण. नेहमीच. त्यांची प्रकृतीच तशी होती म्हणावं काय? अरुण साधूंनी इंग्रजी पत्रकारिता केली. 'स्टेट्स्मन'चे ते मुंबई प्रतिनिधी होते. त्यांच्या न्यूजलेटरची दिल्ली राजकीय वर्तुळात चर्चा होत असे.

पुढे त्यांना 'टाईम्स ऑफ इंडिया'चे संपादक दिलीप पाडगावकरांनी टाईम्समध्ये येण्याची ऑफर केली. त्याच वेळेला फ्री प्रेस जर्नलच्या संपादकपदाची ऑफर आली. अरुण साधू फ्री प्रेस जर्नलचे संपादक झाले. पण हा निर्णय काही हितकारक ठरला नाही. मनःस्तापच झाला.

परिणामी, साधूंनी प्रत्यक्ष पत्रकारितेला रामराम ठोकला. कुलगुरू वसंत गोवारीकर यांनी पुणे विद्यापीठाच्या वृत्तपत्रविद्या विभागाचे संचालकपद दिले, ते त्यांनी स्वीकारले. त्यांच्या हाताखाली शिकाऊ पत्रकारांना काय दिलं हे सांगणारे पत्रकार अजूनही दिसतात. पण त्यांचं म्हणणं असायचं, इंग्रजी पत्रकारिता करा. मुंबईला जा...

ह्याच साधूंवर इथे दुर्दैवाने कुभांड रचलं गेलं. ज्या साधूंचं कौतुक साधुवृत्तीचा म्हणून केलं जायचं, त्याच पुण्यात 'साधू कसले संधीसाधू' असंसुद्धा लिहून आलं...

सगळाच दुर्दैवी प्रकार.

नंतर मात्र अरुण साधूंनी फक्त लेखन आणि लेखनच केलं. त्यात मग कथा, स्तंभलेखन, अनुवाद असे प्रकार आले. सदरलेखन म्हटलं की, त्याला तात्कालिकाचा शाप असतो. थोडं फार ते खरंही आहे. ते भय निर्मितिक्षम साधूंना पण वाटत होतं. पण तो गैरसमज विजय तेंडुलकरांनी त्यांना समजावून काढून टाकला.

पुढे 'महानगर' अंकातील 'अक्षांक्ष-रेखांश' सदरातील लेखाचं त्याच नावानं पुस्तक आलं. त्याला विजय तेंडुलकरांचीच प्रस्तावना आहे. त्यात त्यांनी साधूंचं नेमकं वैशिष्ट्य नोंदवलं आहे, साधू यांचे लेखन भपकेबाज नाही; इतकंच नव्हे तर अनलंकृत आणि नको तेवढं साधं आहे. परंतु ते चित्त वेधून घेते. त्याचे कारण त्यामागचे मन जिवंत आहे. जिज्ञासेने ओतप्रोत भरलेले आहे, चौरस आहे, प्रश्नांना जाऊन थेट भिडणारे आहे. त्यांच्या उत्तरांचा ध्यास घेणारे आहे. वैविध्य तर या लेखनात आहेच. स्तंभलेखकाचे मन चौरस नसेल, अनेक विषयांत, अनेक प्रकारच्या अनुभवांत त्याला रस नसेल, अपरिचित प्रदेशात घुसून त्यांचा परिचय करून घेण्याचा आणि देण्याचा ध्यास नसेल तर त्याचे स्तंभलेखन ठरावीक परिघातच घोटाळते, ठरावीक वळणे घेत राहते. आणि शब्दांचा फुलोरा त्यातील तोच तोचपणा फार काळ झाकू शकत नाही. साधू यांच्याकडे विषयाला तोटा नाही. चौकसपणा उदंड आहे. अपरिचित प्रदेशाचे भान आहे. त्यांचा परिचय करून घेण्याची अथक इच्छा आहे. त्यामुळे या पुस्तकातील दर स्फुटात आपल्याला नवे काही तरी भेटते. नवे कळते. विचाराला नवी चालना मिळते. त्यामुळेच तसा रुक्ष शीर्षकाचा, शैलीहीन आशय-जड असा हा स्तंभ एका सायं दैनिकात येत राहूनही (त्यात असले काही अपेक्षित नसते) सातत्याने चालला आणि वाचला गेला.



**पुढे 'महानगर' अंकातील 'अक्षांक्ष-रेखांश' सदरातील लेखांचं त्याच नावानं पुस्तक आलं. त्याला विजय तेंडुलकरांचीच प्रस्तावना आहे. त्यात त्यांनी साधूंचं नेमकं वैशिष्ट्य नोंदवलं आहे. साधू यांचे लेखन भपकेबाज नाही; इतकंच नव्हे तर अनलंकृत आणि नको तेवढे साधे आहे. परंतु ते चित्त वेधून घेते. त्याचे कारण त्यामागचे मन जिवंत आहे. जिज्ञासेने ओतप्रोत भरलेले आहे, चौरस आहे, प्रश्नांना जाऊन थेट भिडणारे आहे. त्यांच्या उत्तरांचा ध्यास घेणारे आहे. वैविध्य तर या लेखनात आहेच.**



अरुण साधूंच्या सगळ्याच लेखनाचा विशेष म्हणजे त्यात नवे काही तरी दिसते, विचाराला नवी चालना मिळते, हे नक्की. म्हणून तर अरुण साधू हे नाव लेखनाच्या प्रांतात प्रस्थापित झालं. पाहिजे तर त्यांच्या साहित्याची सूची डोळ्यांपुढे आणा ज्यात कादंबऱ्या, कथासंग्रह, नाटक-एकांकिका, ललितेतर पुस्तकं वा भाषांतरं, समकालीन इतिहास असं सगळं आहे.

मराठी लेखकाच्या आयुष्यात अ. भा. साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद मिळणे, मिळवणे हे ईप्सित स्पष्ट-अस्पष्ट असतेच. अरुण साधूदेखील ८०व्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष म्हणून निवडून आले.

आता अध्यक्ष म्हटलं की, त्यानं भाषण करणं आलंच. तसं साधूंनीपण केलं. त्यात मुख्य मुद्दा मराठी आणि मराठी माणसाबाबत होता. सगळी भाषणं कानावरून जातात तसंच झालं असावं. कारण साधू म्हटलं की, त्यांचं हे भाषण आठवतं का? असो म्हणजे हे नसो...

मात्र नागपुरात साहित्य संमेलनाचे अध्यक्ष म्हणून त्यांचा हवा तसा आब राखला गेला नाही. दुर्लक्ष, उपेक्षा अशा सगळ्या गोष्टी. याबाबत बोलताना ते म्हणाले होते, ''मान सांगावा जनात, अपमान ठेवावा मनात...''

या संबंधात त्यांनी लेख लिहावा असा आग्रह दीपावलीचे संपादक अशोक कोठावळे यांनी धरला, तेव्हा साधू म्हणाले, मी बोलेन, कुणीतरी शब्दांकन करावे. ती जबाबदारी माझ्यावर टाकण्यात आली.

त्यासाठी झालेल्या बैठकीत साधू जे दिसले ते वेगळेच. ह्या मुलाखतीचे शीर्षकच 'मान सांगावा जनात...' असे होते. पण हे शब्दांकन तपासून आलं, तेव्हा त्यातला सगळा राग साधूंनी जणू काढूनच टाकला. जणू त्यांना संमेलनाच्या आयोजकाला म्हणायचं होतं, चलो माफ कर दिया... साधू प्रकृती म्हणतात ती हीच... पण प्रसंगी साधू आपल्या निर्णयाला धरून राहतात, कुणाची भीडभाड ठेवत नाहीत. हे दिसून आलं ते मावळते अध्यक्ष असताना! पण तत्पूर्वी नागपूर येथे साहित्य संमेलनात पडद्यामागे घडलेली हकीगत सांगायला हवी. साधू स्वतंत्र विदर्भाच्या विरोधात सुरुवातीपासून होते. ते जगजाहीर होतं. पण नागपुरात संमेलनात खुल्या अधिवेशनात स्वतंत्र विदर्भाचा पुरस्कार करणारी मंडळी तो ठराव आणणार असं दिसायला लागलं. अर्थात, ही गोष्ट लपून राहणं शक्यच नव्हतं. साधूंनी स्पष्टपणे सांगितलं की, स्वतंत्र विदर्भाचा ठराव खुल्या संमेलनात संमत होणार असेल तर मी खुलं संमेलन सोडून निघून जाईन...

साधूंचा हा पवित्रा पाहताच मग मात्र मनोहर म्हैसाळकर वगैरे मंडळींनी सामोपचाराने हे प्रकरण मिटवलं. हा ठराव मांडला गेला नाही. पुढचा सगळाच राग-रंग मिटला... पण त्याच्या पुढच्याच वर्षी पेचप्रसंग निर्माण झाला. तो सांगली येथे झालेल्या साहित्य संमेलनात. संमेलनाध्यक्ष होते म. द. हातकणंगलेकर, तर उद्घाटक राष्ट्रपती प्रतिभा पाटील. राष्ट्रपतींबाबत भले काही शिष्टाचार असेल, पण साहित्य संमेलनासारख्या ठिकाणी जेथे साहित्यिकांची आणि साहित्यप्रेमींची मांदियाळी गोळा झालेली असते, त्या ठिकाणी असल्या शिष्टाचाराला मुरड घालायला हवी होती. निदान कुणी तरी जबाबदार व्यक्तीने त्याबाबत पुढाकार घ्यायला हवा होता... पण ते काही झालं नाही आणि शिष्टाचाराचा अतिरेक होतो की काय असं दृश्य दिसायला लागलं. त्याचा त्रास साहित्यिकांना तर होत होताच, पण त्यातून खुद्द साहित्य संमेलनाध्यक्षदेखील सुटले नाहीत. हा उपमर्द नक्कीच होता. फक्त तो किती जणांना जाणवला? आणि त्याविरुद्ध निदान 'ब्र' तरी कुणाला काढायचं सुचलं का?

नाही. एकही नाही!

फक्त अरुण साधू एकटे त्याविरुद्ध उभे राहिले आणि या सगळ्याचा निषेध म्हणून साहित्य संमेलनाच्या मंडपातून ते निघून गेले. गाजावाजा न करता...मावळत्या अध्यक्षाकडून अध्यक्षपदाची सूत्रं नव्या अध्यक्षाकडे देण्याचा जो उपचार असतो तो झालाच नाही... अर्थात, इये मराठीचिये नगरी पुढच्याच वर्षी अध्यक्ष नसतानासुद्धा साहित्य संमेलन बिनबोभाट पार पडले तेथे अरुण साधूंच्या निषेधांची दखल तरी किती जणांनी घेतली कुणास ठाऊक. मग त्याचा परिणाम तर फार पुढची गोष्ट झाली...

संमेलनाकडून, संमेलनाध्यक्षाकडून अपेक्षाच करणे गैर आहे, असंच म्हणायचं का?...

प्रसंगी अरुण साधू कसे निर्भय होते त्याचेच हे उदाहरण. असा हा माणूस, लेखक मग स्वतःच्या साहित्याबाबत किती कठोर असू शकतो ह्याचं उदाहरण सांगण्यासारखं आहे. एका महाकादंबरीची ते तयारी करत होते. तीनशे-साडेतीनशे पाने लिहून झाली होती. वर्णद्वेष, वंशद्वेष, विज्ञाननिष्ठता, धर्मनिरपेक्षता ह्या सगळ्यांचा कल्लोळ ह्या लिखाणात होता. पण अयोध्यापाठोपाठ घटनांनी सगळं गणितच बिघडलं. लिहिलं ते साधूंना निरर्थक वाटायला लागलं. हे सगळं लिहायला हवंच का, असं वाटायला लागलं...

आणि साधूंनी तो ड्राफ्ट टाकून दिला! हे सगळं घडायला साधूंची प्रकृतीपण कारण असावी. ज्ञानी माणसाचं असंच असतं का, की आयुष्याच्या संध्याकाळी बरंच काही सुचत असतं. काही करावंसं वाटत असतं. पण प्रकृतीने दगा द्यायला सुरुवात केलेली असते. मग सुरू होते ती कुतरओढ... प्रेरणा आणि प्रकृती ही लढाई विषम ठरते. अरुण साधूंच्या बाबतीत असंच काहीसं झालं असावं. शेवटी २५ सप्टेंबर २०१७ला साधू गेले. एका सत्त्वशील लेखकाची कहाणी संपली. अरुण साधूंनी देहदान केले. पुराणकाळातील साधूंच्या हकीगती सांगतात की, त्यांच्या हाडाकाडाचापण त्यांनी उपयोग करू दिला.

पुराणातील वानगी पुराणात.

आजच्या जमान्यातला अरुण साधू नावाचा लेखक त्या परंपरेला जागला. माझ्या माहितीत देहदान करणारा हा एकमेव लेखक असावा. खरे साधू दुर्मीळच असतात. त्याला अरुण साधू अपवाद नाहीत असं म्हणता येईल. रूढ चौकटीबाहेरचा लेखक...

■

रविप्रकाश कुलकर्णी
३, स्वप्नसाकार,
घ. ना. चौधरी हायस्कूलजवळ,
डोंबिवली (पू.)- ४२१२०१
चलभाष : ९२२४८७२८७०













श्रद्धांजली

**वैजनाथ महाजन**

# ह.मो.मराठे :
# साहित्यिक संपादक



**ह. मों.च्या कारकिर्दीत 'किर्लोस्कर'चा दबदबा वाढला आणि खप पण वाढला. याच काळात ह. मो. मराठे या लेखकाने आपला कथा लेखनाकडे मोर्चा वळविला आणि विपुल कसदार कथा लिहिल्या. 'घोडे', 'युद्ध' सारख्या संग्रहांतून ह्या कथा आजही आपणाला भेटत असतात. बऱ्याच लेखकांचा प्रवास हा कथा-कादंबरी असा असतो. पण ह.मों.चा प्रवास कादंबरी-कथा असा घडला, हे पण नमूद करायला हवे. एके ठिकाणी ठाण मांडून बसावे ही ह.मों.ची प्रकृती नव्हती आणि प्रवृत्ती पण नव्हती. नवनवीन क्षितिजे त्यांना नेहमीच खुणावत असत. यातूनच ते काही काळाने 'लोकप्रभे'चे संपादक झाले. लोकप्रभेचे त्यांचे संपादन पण नजरेत भरावे असेच होते.**



हनुमंत मोरेश्वर मराठे असे एखाद्या सर्वसाधारण मध्यमवर्गातील लिपिकाचे अथवा लघुलिपिकासमीप जाणारे नाव धारण केलेल्या ह. मो. मराठे या माणसाने मराठी साहित्यक्षेत्रात दिगंत कीर्ती मिळविली आणि ती आपल्या अखेरच्या श्वासापर्यंत तशीच जपून ठेवली. कारण ही सर्वस्वी त्यांचीच मिळकत होती. ह. मो. हे एवढे वाचकप्रिय होते की, त्यांचा वाचकांना आणि आप्तस्वकियांना ह. मो. एवढाच उल्लेख पुरेसा व्हायचा. कोल्हापूरच्या दैनिक 'पुढारी'तून त्यांनी अनेक वर्षे 'पहिला चहा' हा स्तंभ लिहिला आणि तो केवळ ह. मो. याच अद्याक्षरांनी लिहिला. अत्यंत चुरचुरीत असा समाजभाष्याचा हा स्तंभ असायचा. याच काळात त्यांनी काही वर्षे दै. पुढारीची रविवार पुरवणी संपादित केली आणि समृद्ध पण बनविली.

ह. मो. हे कोल्हापूरच्या अत्यंत नावाजलेल्या अशा राजाराम कॉलेजचे कुशाग्र बुद्धीचे विद्यार्थी. या काळात प्रा. मुकुंद दातार, प्रा. माधव माळी, प्रा. मंदाकिनी महाजन हे त्यांचे सहाध्यायी होते आणि ह्या साऱ्यांची नांगरणी करण्याकरिता प्रा. पां. नां. कुलकर्णी, प्रा. वा. पु. गिंडे, प्रा. अंबुजा सोनटक्के, प्रा. भगवंत देशमुख, प्रा. दु. का. संत अशी मातब्बर मंडळी होती. यातूनच ह. मो. यांची वाङ्मयीन अभिरुची संपन्न आणि समृद्ध होत गेली. बी. ए. मराठी प्रथम श्रेणीत उत्तीर्ण झाल्यावर त्वरित ह. मो. यांना त्या काळातील सुविधेनुसार अधिव्याख्याता होण्याची संधी चालून आली आणि त्यांनी ती फक्त वर्षभर घेतली. कारण रोज तेच तेच शिकविण्यात रमणारी अशी त्यांची प्रवृत्ती नव्हती. त्यांच्या संवेदनशील मनाला सतत नवतेचा शोध असायचा. बोलणे कमी पण तितकेच मार्मिक. त्यातून त्यांचा गोतावळा वाढत गेला. पण सभा संमेलनात रेंगाळण्याचा त्यांचा स्वभाव नव्हता. विद्यापीठ स्तरावरील चर्चासत्रांना मात्र ते आवर्जून हजेरी लावत आणि अशा चर्चासत्रातून आपली मते, हिरिरीने मांडत असत.

उमेदवारीच्या काळात त्यांनी जो सामाजिक दाह अनुभवला, त्यातूनच त्यांनी 'निष्पर्ण वृक्षावर भर दुपारी' लिहिली. ती शंकर सारडा यांनी 'साधने'च्या दिवाळी अंकातून प्रकाशित केली आणि ह. मो. यांचे नाव चौमुखी झाले. ही कादंबरी वाचकांना तर झपाटून गेलीच पण तिने महाराष्ट्रातील बहुतेक साऱ्या विद्यापीठांचे दरवाजे पण ठोठावले आणि ती विद्यापीठात सुप्रतिष्ठित झाली. त्यानंतर ह. मों. नी 'काळेशार पाणी' लिहिली आणि ती पण साधनेने उजेडात आणली. भविष्यात मराठी मुलुखात कोणती समाजस्थिती असेल आणि





तरुणाईला कोणत्या आव्हानांना सामोरे जावे लागेल, त्याचे अत्यंत तिखट भाष्य त्यांच्या ह्या साहित्यकृती करतात आणि ते पण तितक्याच दमदारपणाने करतात.

दरम्यान ह. मो. कोल्हापूर सोडून पुण्यात दाखल झाले आणि मुकुंदराव किर्लोस्करांनी 'किर्लोस्कर' त्यांच्या स्वाधीन केले. त्यामुळे त्यांना अपेक्षित असे खेळते वारे आयतेच प्राप्त झाले. त्यांनी अनेकांना लिहिते केले. अनेक महानुभावांच्या परखड मुलाखती घेऊन त्या वाचकांना सादर केल्या. ह. मों.च्या कारकिर्दीत किर्लोस्करचा दबदबा वाढला आणि खप पण वाढला. याच काळात ह. मों. मराठे या लेखकाने आपला मोर्चा कथा लेखनाकडे वळविला आणि विपुल कसदार कथा लिहिल्या. 'घोडे', 'युद्ध' सारख्या संग्रहांतून ह्या कथा आजही आपणाला भेटत असतात.

बऱ्याच लेखकांचा प्रवास हा कथा-कादंबरी असा असतो. पण ह.मों.चा प्रवास कादंबरी-कथा असा घडला, हे पण नमूद करायला हवे. एके ठिकाणी ठाण मांडून बसावे ही ह.मों.ची प्रकृती नव्हती आणि प्रवृत्ती पण नव्हती. नवनवीन क्षितिजे त्यांना नेहमीच खुणावत असत. यातूनच ते काही काळाने 'लोकप्रभे'चे संपादक झाले. लोकप्रभेचे त्यांचे संपादन पण नजरेत भरावे असेच होते. त्या साप्ताहिकाला पण त्यांनी सुप्रतिष्ठित केले. आज लोकप्रभा साप्ताहिकाने आपले क्षितिज खूपच विस्तारले आहे. अर्थात ते गुणवत्तेच्या बळावरच. त्याची सुरुवात ह.मों.नी केली असे म्हणण्यास हरकत नाही. मग ह. मो. मराठे या संपादकाने 'घर-दार'चा प्रयोग करून पाहिला. पण तो पूर्णत्वास जाऊ शकला नाही. कारण दरम्यानच्या काळात मराठी साहित्याचे आणि मराठी संस्कृतीचे पर्यावरण पण बदलले होते. हे बदललेले पर्यावरण ह.मों.च्या लक्षात आले नसेलच असे नाही, पण त्यांची जिद्द पण कमी नव्हती आणि वाङ्मयीन प्रतिष्ठा पण चढत्या श्रेणीचीच होती.

याच काळात ह. मो. मराठे यांनी 'इतिवृत्त' आणि 'सॉफ्टवेअर'सारख्या सरस आणि काळाला सुरस वाटाव्यात अशा समर्थ कादंबऱ्या लिहिल्या आणि आपल्या वाचकांना पुन्हा बदलत्या वाहत्या वाऱ्याची दिशा दाखवून देण्याचा सकस असा प्रयत्न केला. 'तो सेंटिमेंट प्लीज' ही त्यांची कादंबरी मात्र वाचकांना फारशी रुचली नाही. कारण तिचा विषय सर्वांना सहजमान्य होण्यासारखा नव्हता. तो अद्याप समाजात तसा रुजलेला पण नव्हता. पण ह. मो. मराठे हा लेखनकाळाच्या पुढे पाहणारा आणि पुढील काळ नेमक्या शब्दांत वाचकांच्यासमोर ठेवणारा असाच लेखक होता. म्हणून ह. मो. सध्या काय करतायंत याबाबत सांस्कृतिक जगतात नेहमीच कुतूहल असायचे आणि ते ह. मो.ना पण तितकेच सुखावत असायचे.

लेखक म्हणून आणि त्यानंतरचे साहित्यिक म्हणून ह.मों.ची मिळकत वाढत होती. केवळ पेनद्वारे. ह.मों.नी कधी बॉलपेन वापरले नाही. 'बॉलपेन'ला कसलेही खानदान नाही, असे ते हसत हसत सांगायचे आणि आपले पेन पुनःपुन्हा चाचपून पाहत असायचे. 'बालकांड' आले आणि ह.मों.च्या नावाची पुन्हा नव्याने चर्चा सुरू झाली. यातील वाटा आणि वळणे वाचकांना चक्रावून टाकणारी होती. हनुचे बालपण आणि त्यातील दुर्दैवाच्या दशावताराने वाचक कमालीचे अस्वस्थ झाले आणि ह.मो. मराठे यांना आपण आपलाच दस्तऐवज वाचकांच्यासमोर ठेवल्याचे लक्षणीय समाधान लाभले. बालकांडमुळे वाचकांना ह.मों.नी सोसलेल्या कळा पण समजल्या आणि त्यांच्या परिस्थितीच्या झळा पण उमजल्या. त्यानंतर त्यांनी 'पोहरा' लिहिले, पण त्याची 'बालकांड' इतकी चर्चा झाली नाही. त्यांनी आपल्याच लेखनाशी संलग्न असलेली अशी एक मालिकापण लिहून पाहिली. पण त्या घाईगर्दीच्या लेखनात त्यांचा जीव काही रमला नाही. जो मार्ग आपणाला आपला वाटत नाही, त्या दिशेला आपण जायचे नाही, हा त्यांचा सुरुवातीपासूनच इरादा होता. तो त्यांनी इथे पण खरा करून दाखविला.

मराठी साहित्यविश्वात ह.मो. मराठे हे साहित्यिक म्हणून दीर्घकाळ उठून दिसलेले आहेत. संपादक म्हणून त्यांनी अनेक नवागतांना हात दिलेला आहे. वेळोवेळी प्रोत्साहन दिलेले आहे. वृत्तपत्रातील लेखनावर संस्करण केलेले आहे. रत्नागिरीच्या ज्या 'बलवंत' साप्ताहिकातून ते प्रथम लिहिते झाले, ते साप्ताहिक पण त्यांनी अखेरपर्यंत आपले मानले. आपल्या गुरुजनांच्याबद्दलची कृतज्ञता ते कधी विसरले नाहीत. वाचकांना त्यांच्यातील 'हनु' खूपच भावला आणि त्या हनुकडूनच एवढे साजिरे आणि गोजिरे साहित्यजगत निर्माण झाले. ह. मो. मराठे नावाचा अव्वल दर्जाचा साहित्यिक आज आपल्यात नाही. तो नव्या क्षितिजाच्या शोधात निघून गेलेला आहे. पण आपण सारे त्या 'हनु'चा चेहरा मात्र सदैव आठवत राहू. कारण तो न विसरता येणारा असा निरागस चेहरा आहे. लेखक म्हणून ह. मो. मराठे यांची ही समृद्धी आपणाला सुखावणारी आहे.

■



अनुक्रमणिका



लेख

रणधीर शिंदे

# लक्ष्मीकांत देशमुख यांच्या कथात्म साहित्याचे स्वरूप



९१व्या अ.भा. मराठी साहित्य संमेलनाध्यक्षपदी मा. लक्ष्मीकांत देशमुख नुकतेच निवडून आले आहेत. त्यांचे अभिनंदन! नवनिर्वाचित अध्यक्षांच्या साहित्याचा आढावा घेण्याचा प्रयत्न या लेखात केलेला आहे.



लक्ष्मीकांत देशमुख यांची वाङ्मयनिर्मिती विविधस्वरूपी आहे. कथा, कादंबरी, नाटक आणि वैचारिक स्वरूपाचे लेखन त्यांनी केले. जवळपास वीसेक ग्रंथांची निर्मिती त्यांच्याकडून झाली. वाङ्मयीन संस्कृतीत अशा निर्मितीचे काहीएक आकलन आणि मूल्यमापन होणे गरजेचे असते. 'कथांजली' (१९८७), 'अंतरीच्या गूढगर्भी' (१९९५), 'उदक' (१९९७) पुढील आवृत्तीचे शीर्षक (पाणी! पाणी! पाणी!), 'नंबर वन' (२००८), 'अग्निपथ' (२०१०), 'सावित्रीच्या गर्भात मारलेल्या लेकी' (२०१३), 'मृगतृष्णा' (२०१६) हे त्यांचे कथासंग्रह प्रसिद्ध आहेत. 'सलोमी' (१९९३), 'ऑक्टोपस' (२००६), 'अंधेरनगरी' (१९९४), 'होते कुरूप वेडे' (१९९७), 'इन्किलाब विरुद्ध जिहाद' (२००४) व 'हरवलेलं बालपण' (२०१४) या त्यांच्या कादंबऱ्या प्रकाशित आहेत. 'दूरदर्शन हाजीर हो' (बालनाट्य, १९९७) व 'अखेरची रात्र' (२०१४) ही त्यांची नाटके प्रकाशित आहेत. 'मधुबाला ते गांधी' हा ललितसंग्रह प्रसिद्ध आहे. याशिवाय 'प्रशासननामा' (२०१३) व 'बखर प्रशासनाची' (२०११) ही त्यांची प्रशासन विषयावरील दोन पुस्तके प्रकाशित आहेत. शिवाय विविध नियतकालिकांतून त्यांनी वैचारिक, सामाजिक व प्रवासवर्णनपर लेखनही केले आहे.

१९८०नंतरच्या मराठी साहित्याचे स्वरूप हे विविधस्वरूपी आहे. साठच्या दशकातील चैतन्यशील अशा साहित्याचे आविष्कार ऐंशीच्या दशकात स्थिरावले होते. भालचंद्र नेमाडे, भाऊ पाध्ये, नारायण सुर्वे व नामदेव ढसाळ यांच्या खुल्या शक्यतांचा शोध घेणारी नवनैतिकतावादी साहित्याची उपस्थिती या काळात होती. मराठी मध्यमवर्गीयांच्या दृष्टीपल्याडच्या नव्या साहित्याचा हा आविष्कार होता. लघुनियतकालिकाच्या चळवळीचे व दलित साहित्याचे जोरकस आविष्कार या काळात प्रकट होत होते. तसेच ऐंशीच्या दशकातही इतरही अस्मिताकेंद्री साहित्यप्रवाह मराठी लेखन परंपरेत निर्माण झाले. मराठी सांस्कृतिक जगताच्या व अभिरुचीच्या कक्षा विस्तारणारे हे साहित्य होते. एक लेखक म्हणून देशमुखांची जडणघडण या सांस्कृतिक पर्यावरणात झाली. देशमुख यांचा लेखन-संवेदन-स्वभाव हा मानवकेंद्री विचारविश्वाकडे झुकणारा आहे. त्यांचा कल स्वाभाविकपणे समाजशील विषयाकडे झुकला. त्यामुळे तसे विषय त्यांच्या लेखनातून आविष्कृत झाले. अवतीभवतीच्या वेगवान उलाढालीला मराठी साहित्याने दिलेल्या प्रतिसादाच्या पार्श्वभूमीवर देशमुख यांनी आपल्या अनुभव प्रदेशातील विषयांना केंद्र बनविले. प्रशासनिक अनुभवाचे क्षेत्र त्यांच्या विविध परी लेखनातून मांडल्या. एकेक प्रश्न, समस्या









अनुक्रमणिका

घेऊन त्या वास्तवाचे विविधलक्ष्यी अक्ष शोधले.

मराठीत इतक्या विपुलतेने प्रशासकीय जीवनातले विषय क्वचितच आले असतील. त्यांच्या लेखनाची अनेक कथाबीजे त्यांच्या अनुभवसृष्टीत आहेत. या कथाबीजांचा विस्तार वेळोवेळी एक लेखक म्हणून देशमुख यांनी केला आहे. जिल्हा प्रशासन, न्यायपालिका ते प्रशासनयंत्रणेतील अनेक अनुभव त्यांच्या लेखनाचे विषय झालेले आहेत. पाणी टंचाई, महापूर, रोजगार हमी योजना, नागरी प्रशासन, ग्रामीण विकास, स्त्रीभ्रूणहत्या असे प्रश्न त्यांच्या कथात्म साहित्यात आहेत. या यंत्रणेतील वारकावे त्यामध्ये आहेत. 'लेखकाला हे अनुभव टिपकागदाप्रमाणे टिपून घेता आले पाहिजेत' असे त्यांनी म्हटले आहे. जिल्हाधिकारी म्हणून जिल्हा प्रशासनातील विविध क्षेत्रांशी त्यांचा जवळून संबंध येतो. या पाहणीतून अनेक विषय त्यांच्या कथा-कादंबऱ्यांचे झाले आहेत. पृष्ठस्तरावरून सर्व काही आबादीआबाद असणाऱ्या या व्यवस्थेच्या तळाशी अनेकविध प्रकारचे गुंते असतात. समाजोपयोगी अशा सेवाक्षेत्रातील अनेक गुंते देशमुख यांचे लेखनविषय झाले आहेत. सामाजिक दस्तऐवजाचे स्वरूप या लेखनास आहे. तसेच रिपोर्ताज स्वरूपाचेही लेखनही त्यांनी केले आहे.

१९६५-६६दरम्यान बालवयात 'साधना' साप्ताहिकातील एका बालकथेने त्यांच्या लिखाणाला सुरुवात झाली. पुढे काही रहस्यकथाही त्यांनी लिहिल्या. आरंभीच्या कथालेखनावर रोमँटिक आदर्शवादाची छाया आहे. 'कथांजली' व 'अंतरीच्या गूढगर्भी' या संग्रहातील कथाविश्व मध्यमवर्गीय भावविश्वाशी संबंधित आहे. स्त्रीपुरुष नात्यांचा शोध, मानवी वर्तनातील काही तणावांचे चित्र या कथाचित्रणात आहे. नंतरच्या काळात समस्याकेंद्री कथामालिका त्यांनी लिहिल्या. पाणीसमस्या, खेळाडूंचे भावविश्व व स्त्रीभ्रूणहत्येचा प्रश्न व स्त्रीपुरुषातील मीलनविश्व या जीवनाधारित कथा लिहिल्या. एकेक प्रश्न घेऊन त्या प्रश्नांचे विविध कंगोरे धुंडाळण्याची त्यांची रीत आहे. थीम बेस्ड कथा म्हणून सामाजिक समस्यांचे चित्रण करणाऱ्या या कथा होत.

'पाणी' या विषयसूत्राची कथामाला त्यांनी लिहिली. महाराष्ट्राच्या अवर्षणग्रस्त परिस्थितीवर भाष्य त्यामध्ये आहे. न पिकलेली शेती, पिण्याच्या पाण्याची समस्या, रोजगार हमीची तुटपुंजी कामे, रेशन दुकानदाराची मनमानी यातून एका कडवट काळ्या रंगाचे चित्र त्यांनी उभे केले आहे. एका बाजूला हिरवा सुपीक समृद्ध प्रदेश आणि दुसऱ्या बाजूला कोरडा भणंग प्रदेश अशा भौगोलिक परिसराचे चित्र आहे. या कथांमध्ये पाण्याविनाची खोलवरची तीव्रता त्यामधून अभिव्यक्त झाली आहे. तसेच पाणी हे बहिष्काराचे व शोषणाचे हत्यारही असू शकते आणि सत्ताधारी वर्ग त्याचा मुजोरपणे वापर करू शकतो, याची जाणीव या कथा देते. एकाचवेळी जात आणि स्त्रीच्या लैंगिक शोषणाची जाणीव ही कथा करून देते. थीम बेस्ड कथेचा आणखी एक आविष्कार म्हणजे 'नंबर वन' हा कथासंग्रह. खेळांडूमधील माणूसपण शोधण्याचा हा प्रयत्न आहे. 'स्व'प्रतिमेच्या आहारी गेल्यामुळे बऱ्याच वेळेला खेळाडूंचे व्यक्तिगत आयुष्य कोलमडून पडते. माणूसपण आणि खेळाडू यांतील दुभंग पेचाचे चित्र त्यामध्ये आहे. समाजाचे रिअल हिरो असणाऱ्या खेळाडूंच्या भावविश्वाची दर्शने त्यामध्ये आहे, विजयासाठी झुंजणाऱ्या खेळाडूंचे जग त्यामध्ये आहे. जीवनातील अडथळे पार करून यशस्वी ठरलेल्या खेळाडूंच्या कथा या संग्रहात आहेत.

'सावित्रीच्या गर्भात मारलेल्या लेकी' हा त्यांचा वैशिष्ट्यपूर्ण आविष्कार करणारा कथासंग्रह. स्त्रीभ्रूणहत्येविषयक जाणीवसूत्र या कथात आहे. भारतीय समाजात स्त्रीकडे नेहमीच गौणत्वाने पाहिले गेले आहे. आधुनिकीकरणाच्या टप्प्यावर एक विचित्र असे समाजवास्तव आकाराला आले आहे. मुलगा हा वंशाचा दिवा, कुलदीपक, म्हातारपणाची काठी अशा चुकीच्या धारणा तयार झाल्या आहेत. लिंग चाचणी ही चांगल्या कामासाठी निष्पन्न झालेली वैज्ञानिक गोष्ट. मात्र त्या आधारे असंख्य निरपराध मुलींना या गर्भातच मारले जाते आहे. विचित्र समाज वास्तवाची कैफियत या कथांमधून मांडली आहे. पुरुषी श्रेष्ठत्वाच्या भावनेने आधुनिक ज्ञानाच्या आधारे क्रूर हिंसा चालू आहे. या विविध कथामालांमधून स्त्रीभ्रूणहत्येविषयीचे चित्रण केले आहे. वर्तमानात आणि भविष्यात अमानवी स्वरूपाचा विषम समाज आपण रचत असल्याचे गंभीर भान या कथा देतात. 'लंगडा बाळकृष्ण' या कथेत प्रतीकात्मक स्वरूपात या स्त्रीभ्रूणहत्येच्या क्रौर्याची परिसीमा काय असू शकते, याचे खोलवरचे चित्रण आहे. चिमण्या गर्भाला नाहीसे करण्यासाठी डॉक्टर पतीने दवाखान्यात दोन कुत्री बाळगलेली असतात. मात्र प्रत्यक्ष स्वतःच्याच मुलाचा लचका ही कुत्री तोडतात, त्यावेळी डॉक्टर कुत्र्यांवर गोळ्या झाडतात. या कथाचित्रणाला समकाळातील सत्यघटनेचे संदर्भ आहेत. गर्भातच मारल्या गेलेल्या अनेक अनाम कळ्यांचे व मातांचे आक्रोश या कथांमध्ये आहेत.

'१९९१- कांद्यापोह्याची सेंच्युरी', '२०११- नकाराचा सिक्सर पण मुलीकडून', '२०३१ किंवा नंतरचं दशक गे-वरवधू सूचक मेळावा' या क्रमाने विवाहसंस्थेचा प्रश्न किती बिकट होईल, याचे सूचना या कथेत आहे. भारतभूमी ही 'लँड विदाउट डॉटर्स' होते आहे याची जाणीव या कथा देतात. ज्यांच्या लेखी 'स्त्री' ही एक क्रयवस्तू आहे आणि तिचं मूल्य



अनुक्रमणिका

**'इन्किलाब विरुद्ध जिहाद' ही लक्ष्मीकांत देशमुख यांची वेगळ्या विषयावरची कादंबरी. मराठीत दीर्घ अशा कालावकाशाचे चित्रण असणाऱ्या कादंबऱ्या फारशा नाहीत. वास्तविक कादंबरीसारख्या साहित्यप्रकारात मानवी जीवनाचे, त्याच्या दीर्घ अशा कालावकाशाचे चित्रण करण्यास फार मोठा अवसर असतो. मात्र अशा दीर्घ पल्ल्याच्या कादंबऱ्या मराठीत फारशा नाहीत. 'इन्किलाब विरुद्ध जिहाद' या जवळपास साडेनऊशे पृष्ठांच्या कादंबरीत प्रदीर्घ अशा धर्मयुद्धाचे चित्रण आले आहे. ...मराठी कादंबरीत प्रथमतःच आंतरराष्ट्रीय राजकारणाचे, तेथील सत्तासंघर्षाचे, बदलत्या समाजजीवनाचे व राजकारणाचे चित्र अभिव्यक्त झाले आहे.**

नगण्य आहे, ती पुरुषांना हवी तेवढीच, तेवढ्या प्रमाणात मालकी हक्कानं हवी, या विचारदृष्टीचा प्रभाव त्यांच्या या कथांवर आहे. या कथेतील मुलगी शेवटी म्हणते, 'ही कथा वाचून काही पुरुषांच्या डोळ्यात अंजन पडलं तरी माझ्या न जगलेल्या जन्माचं सार्थक होईल.' या समस्याप्रधान विचारकथा आहेत.

समस्याचित्रण, राजकीय जाणिवा ते आंतरराष्ट्रीय दहशतवादाचे चित्रण असे विविध विषय त्यांच्या कादंबऱ्यांतून चित्रित झाले आहेत. 'सलोमी' व 'हरवलेलं बालपण' या कादंबऱ्यांतून सामाजिक समस्येचे चित्रण मांडले आहे. 'ऑक्टोपस' व 'अंधेरनगरी' या दोन कादंबऱ्या प्रशासन विषयावरच्या आहेत, तर 'इन्किलाव विरुद्ध जिहाद' या बृहद कादंबरीत एका वेगळ्या विषयाची मांडणी केली आहे. मराठी कादंबरीत राजकीय जीवनाचे चित्रण फारसे प्रभावीपणे आलेले नाही. सामाजिक जीवनातील राजकारणाचे ताणेवाणे, त्यातील सूक्ष्मता कादंबरीत मराठी लेखकांना फारशी आणता आलेली नाही. आणि आली तरी ती पृष्ठस्तरावरून कादंबरीचे नेपथ्य वा पार्श्वभूमी म्हणून आलेली आहे. राजकारणाचा खोलवरचा वेध घेणाऱ्या कादंबऱ्या मराठीत अपवादानेच आढळतात. 'सलोमी' आणि 'दौलत' (१९९०) या त्यांच्या दोन लघुकादंबऱ्या. 'सलोमी' या साठेक पृष्ठांच्या लघुकादंबरीत एका मुस्लीम बंडखोर तरुण स्त्रीच्या वाताहतीची कहाणी सांगितली आहे. आधुनिक काळातही मुस्लीम स्त्रियांना स्वातंत्र्याचा अवकाश उपलब्ध नाही. स्वतःच्या मनासारखे निर्णय त्यांना घेता येत नाहीत. अशा वेळी त्यांच्या मनाची होणारी पराकोटीची कुचंबणा हा या कादंबरीचा विषय आहे. सलोमीच्या २८ वर्षांतील पूर्वकाळातील नोंदी या कादंबरीत आहेत. धर्मांध रूढी-रिवाजांचे चित्रण आहे, तर त्याच काळातील नव्या सामाजिक जागरणाच्या अवकाशाचेही चित्रण तीमध्ये आहे. पितृसत्तेची दहशत आणि सामाजिक नियमनात स्त्री अंतिमतः बळी पडते. तिच्या शारीर व मानसिक बळी पडण्याचे संवेदन या कादंबरीत आहे. मुस्लीम कुटुंबातील स्त्रीच्या केविलवाण्या जगाची कैफियत आहे. समकालीन जीवनातील रझिया पटेल यांच्या सिनेमाबंदी चळवळीची पार्श्वभूमी या कादंबरीमागे आहे. सलोनीचे हे आत्मनिवेदन आहे. पत्रात्मक तंत्राचा वापर या कादंबरीत आहे. 'दौलत' या कादंबरीत महाराष्ट्रातील दौलत या दलित तरुण व मारिया या निग्रो तरुणीच्या प्रेमकहाणीचे चित्रण आहे. मात्र या प्रेमकहाणीस वर्णभेदाची व रंगभेदाची पार्श्वभूमी आहे. पत्रशैलीचा प्रभाव या कादंबरीवर आहे. माणूसपण नाकारणाऱ्या भारतातील जातवास्तवाची पार्श्वभूमी आहे.

'हरवलेले दिवस' (२०१४) या कादंबरीत बालमजुरांच्या समस्याग्रस्त जीवनाचे चित्रण आहे. बालमजुरांच्या दाहक प्रश्नांचे चित्र या कादंबरीत आहे. बालमजुरीच्या प्रश्नाला किती कंगोरे आहेत, याचे समाजशास्त्रीय संवेदन या कादंबरीत आहे. दुकाने, कारखाने, वीटभट्टी, हॉटेलमधून काम करणारी मुले व त्यांचे विश्व या कादंबरीत आहे. त्यांचे सर्व बाजूने शोषण होते. शारीरिक व मानसिक पातळीवर त्यांचे पराकोटीचे शोषण होते. समाजाच्या अत्याचाराचे बळी होतात. त्यांचे बालपण व जीवनातील आनंदमयता हरवून जाते. वेठबिगार म्हणून त्यांना वागविले जाते. राज्यकर्ते, प्रशासन व मुजोर मालकवर्ग यामध्ये सहभागी असतो. त्यांचे हितसंबंध असतात. अनेक अनाम मुलांचे मूक आक्रोश संवेदनाहीन समाजाला ऐकू येत नाहीत. एक तर तो केवळ निर्ढावलेला आहे. या प्रकारची व्यवस्था ही जणूकाही मुलांची यातनागृहेच आहेत. या साऱ्या प्रश्नासाठी अरुण काही मित्रांना बरोबर घेऊन बालमजुरांच्या पुनर्वसनाचा कार्यक्रम घेतो. त्यात त्याला यशही येते. सतत आपल्यातला लढाऊपणा जिवंत ठेवतो. बालमजुरांच्या कळवळ्यापोटी सहानुभावाने तो हे करत राहतो. त्याची कहाणी 'हरवलेले दिवस' मध्ये आहे.

लक्ष्मीकांत देशमुख यांच्या कादंबरीवाङ्मयाचा महत्त्वाचा संदर्भबिंदू जिल्हा प्रशासन व न्यायपालिकेतील राजकारणाचे चित्रण हा आहे. 'ऑक्टोपस' ही महसूल विभागातील भ्रष्टाचाराचे चित्रण करणारी कादंबरी आहे. आनंद पाटील या

प्रामाणिक काम करणाऱ्या जिल्हाधिकाऱ्याच्या नजरेतून किडलेल्या भ्रष्टाचारी जगाचे विश्व या कादंबरीतून मांडले आहे. भ्रष्टाचार चहूबाजू व्यापला आहे. संवेदनशील अधिकाऱ्यांची या व्यवस्थेत प्रचंड घुसमट होते. कादंबरी शीर्षकात 'ऑक्टोपस' हे एक रूपक योजिले आहे. ऑक्टोपस समुद्रजीवांचे भक्ष्य सापडताच तो त्याला चहूबाजूंनी वेढून टाकते. ऑक्टोपस बाह्यरूपाने नाजूक आणि मृदू दिसतो. मात्र आपले भक्ष्य पायांनी पकडून तो त्या जिवाला गिळंकृत करतो. तद्वत भ्रष्टाचारात गुंतलेल्यांना भ्रष्टाचाराचे हे जग वरून मोहक वाटते. मात्र आतून त्याची सर्वव्यापक गिळकृंतता लक्षात येत नाही. तसेच या भ्रष्टाचाररूपी ऑक्टोपसने भारतीय समाजाला चहूबाजूने वेढून टाकले आहे. या मूल्यभानाचा आविष्कार ही कादंबरी करते. 'अंधेरनगरी' ही त्यांची आणखी एक महत्त्वाची कादंबरी. राजकारण व प्रशासनातील एका वेगळ्या पैलूवर प्रकाश टाकणारी ही कादंबरी आहे. नगरपालिकेच्या सत्ताकेंद्राच्या प्राप्तीचा संघर्ष तीमध्ये आहे. सर्व तऱ्हेच्या कपटनीतीचा अवलंब सत्तासोपानासाठी कसा केला जातो, त्याचे चित्रण आहे. राजकारणातील सूक्ष्म तपशिलातून, सत्तासंघर्षाचे विश्व या कादंबरीतून साकार झाले आहे. अंतिमत: ते सत्तेच्या खुर्चीभोवती पिंगा घालून तिथेच विराम पावतात. सत्ताप्राप्तीसाठी साम, दाम, दंड, भेद या नीतीचा अवलंब केला जातो. 'उद्या पुन्हा हाच खेळ' याप्रमाणे पुन्हा एकदा राजकारणाचा नवा खेळ आकाराला येतो. त्यात कपटनीतीच्या अंधेरनगरीचा शोध आहे. नगरपालिकेतील सत्तासंघर्षाला किती विविध तऱ्हेचे कंगोरे असतात, याची प्रचिती या कथनसूत्रात आहे. राजकीय गणिते, समाजकारण, जातकारण, प्रदेश अस्मिता ते सूडनाट्याची व्यूहरचना या कादंबरीत आहेत. सत्ताप्राप्तीच्या आंतरिक वास्तवाचा वेध या कादंबरीत आहे. Every Thing is Fair in love, war and politics या विचारसूत्राचा आविष्कार या कादंबरीत आहे.

'इन्किलाब विरुद्ध जिहाद' ही लक्ष्मीकांत देशमुख यांची वेगळ्या विषयावरची कादंबरी. मराठीत दीर्घ अशा कालावकाशाचे चित्रण असणाऱ्या कादंबऱ्या फारशा नाहीत. वास्तविक कादंबरीसारख्या साहित्यप्रकारात मानवी जीवनाचे, त्याच्या दीर्घ अशा कालावकाशाचे चित्रण करण्यास फार मोठा अवसर असतो. मात्र अशा दीर्घ पल्ल्याच्या कादंबऱ्या मराठीत फारशा नाहीत. 'इन्किलाब विरुद्ध जिहाद' या जवळपास साडेनऊशे पृष्ठांच्या कादंबरीत प्रदीर्घ अशा धर्मयुद्धाचे चित्रण आले आहे. भारतालगत वसलेल्या अफगाणिस्तानातील पन्नास वर्षांची राजकीय वाटचाल या कादंबरीत आहे. विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात ज्या आंतरराष्ट्रीय दहशतवादाने अधिक भयावह रूप धारण केले आहे, त्या वास्तवाचे मराठी कादंबरीत प्रथमत:च आंतरराष्ट्रीय राजकारणाचे, तेथील सत्तासंघर्षाचे, बदलत्या समाजजीवनाचे व राजकारणाचे चित्र अभिव्यक्त झाले आहे. कादंबरीतला प्रमुख संघर्ष आहे तो क्रांती विरुद्ध धर्मयुद्ध यांच्यातील. विशिष्ट प्रदेशातील सामूहिक मनाला व जीवनरीतीला विशिष्ट आकार प्राप्त झालेला असतो. अफगाणिस्तानात समूहजीवनावर व संस्कृतीवर धर्मभावनेचा मोठा प्रभाव आहे. आधुनिकीकरणाच्या टप्प्यावर अफगाणमधील बदलाला सामोरे जाताना मुळातल्या जिहादचा उद्रेक होतो. आणि वणव्याप्रमाणे तो सर्वत्र पसरतो. या राष्ट्राचा काही काळ सोव्हियत युनियनशी संबंध येतो. आणि मार्क्सवादी आधुनिकतावादी राजकीय विचारसरणीशी अफगाणमधील लोकांचा संबंध येतो. ही विचारसरणी रुजताना मूळच्या परंपरेतील मूळ आकारांना तडे जातात. ते दुभंग होतात. मात्र चिवट अशा धर्मप्रेरणेमुळे ही सर्व माणसे धर्मसंस्काराला जवळ करतात व जिहादच्या वाटेने राज्यसंस्थेला आपलेसे करतात. कादंबरीतील जीवनचित्रणास बदलत्या आंतरराष्ट्रीय राजकारणाचा संदर्भ आहे.

अफगाणिस्तानातील समूहदर्शन, संस्कृतिचित्रण, कौटुंबिक स्थितीची वर्णने, तिथला लोभस आणि मोहक निसर्ग, परंपरा आणि आधुनिकता यांतील संघर्ष, स्त्रियांच्या हलाखीच्या दु:खभऱ्या करुण कहाण्या या कादंबरीत आहेत. या प्रकारच्या जीवनचित्रणासाठी देशमुख यांनी अनेकविध पात्रांची निर्मिती केली आहे. मुस्लीम पुश्तू कुटुंबातील समाजदर्शन तीमध्ये आहे. एकाच वेळी वास्तव आणि कल्पित यांच्यातील बेमालूम मिश्रण तीमध्ये आहे. ही कादंबरी त्यांनी मोठ्या कष्टपूर्वक व व्यासंगपूर्ण रीतीने लिहिली आहे. विशेषत: दहशतवादासारख्या संवेदनशील विषयावर लिहिणे ही अवघड अशी बाब असते आणि तो विषय जबाबदारीच्या भानातूनही लिहिला गेला पाहिजे. अशा प्रसंगी लेखकावर बाहेरचे अनेक दाब असतात. जवळपास आठेक वर्षांच्या कष्टसाध्य व्यासंगाने ही कादंबरी आकाराला आलेली आहे. यासाठी त्यांनी इतिहास, धर्मशास्त्र, संस्कृती व समकालीन घडामोडीवरील विपुल संदर्भसाधने वापरली आहेत. विशेषत: या कादंबरीत अफगाणिस्तानातील समूहदर्शन आणि तेथील जीवनरीतीचे फार बारकाईने चित्रण आले आहे. एका अपरिचित अशा मुस्लीम जगाला सजीव करण्यासाठी लेखकाने फार मेहनत घेतलेली आहे. संस्कृतीच्या जीवनचित्रणासाठी धर्म व संस्कृतीचा मोठा पट उभा केला आहे. वातावरण निर्मितीसाठी व समूहदर्शनासाठी उर्दू-फारसी पुश्तू भाषाचिन्हांचा मोठा वापर यामध्ये आहे. ओघवत्या व प्रवाही अशा गद्यलयीत कादंबरीतील कथन पुढे सरकते. एक



अनुक्रमणिका

**वाङ्मय व संस्कृती व्यवहाराशी संबंधित वास्तव नवनिर्वाचित अध्यक्षांना ध्यानात घ्यावे लागणार आहे. वाङ्मयनिर्मितीचा आविष्कार नव्या संक्रमणातून जातो आहे. विज्ञान, तंत्रज्ञानाचा अपरिमित वेगामुळे वाङ्मयाचे सारे संभाषितच बदलले आहे. 'क्षणाक्षणाला जग बदलते' असे या काळाचे वर्णन नामदेव ढसाळांनी केले आहे. त्यामुळे हा कालस्वर आणि त्यातील निर्मिती-ताण समजून घ्यावे लागणार आहेत. वाङ्मय व्यवहारातला अत्यंत महत्त्वाचा घटक म्हणजे वाचक. या वाचकाची दखल वाङ्मयीन व्यवहारात घेतली जात नाही. वाचकदेखील नव्या माध्यमाला प्रतिसाद देत आहे. त्यामुळे छापील पुस्तकांऐवजी ई-बुककडे तो संक्रमित होतो आहे.**

धगधगता राजकीय दहशतवादाचा इतिहास जिवंत केला आहे.

प्रशासनविषयक लेखन हा देशमुख यांच्या एकूण लेखनाचा एक महत्त्वाचा आविष्कार आहे. ललित साहित्यातून तर त्यांनी या प्रकारचे चित्रणक्षेत्र मोठ्या प्रमाणात आणले. शिवाय इतरही प्रशासनविषयक वैचारिक स्वरूपाचेही लेखन त्यांनी केले आहे. या विषयावरची त्यांची 'प्रशासननामा' व 'बखर प्रशासनाची' ही दोन पुस्तके प्रसिद्ध आहेत. जिल्हाप्रशासन हा या लेखनाचा केंद्रवर्ती विषय आहे. गावपातळी ते जिल्हा पातळीवरील प्रशासनाचे संदर्भक्षेत्र या लेखनात आहे. कल्याणकारी राज्यासाठी प्रशासक सकारात्मक दृष्टिकोनातून कसे काम करू शकतो, याचे एक चित्र या लेखनात आहे. भारतीय प्रशासनाची ब्लू प्रिंट या लेखनात आहे. राज्यकर्ते व प्रशासन यांतील गुंतागुंतीचे ताण या लेखनात आहेत. 'बखर : भारतीय प्रशासनाची' या ग्रंथात देशमुख यांचे भारतीय प्रशासनावर आधारलेले लेखन आहे. भारतीय प्रशासनाचा पूर्वोत्तर वारसा ते समकालीन भारतीय प्रशासनव्यवस्था यावरचे विवरण आहे.

देशमुख यांनी काही ललित व रिपोर्ताज स्वरूपाचे लेखन केले आहे. श्रीलंका, अमेरिका, उ. प्रदेश व काश्मिरमधील काही प्रवासकथने लिहिली आहेत. तसेच काही आत्मपर स्वरूपाचेही लेख प्रसिद्ध आहेत. शिवाय नाटक व चित्रपटविषयक मर्मग्रहणेही त्यांनी लिहिली आहेत. यातून त्याचे समाजसंस्कृतीविषयक भान प्रकट झाले आहे.

गिरीश कार्नाडांच्या भारतीय रंगभूमीवरील कामगिरीचा परामर्श घेणारा 'गिरीश कर्नाड- भारतीय रंगभूमीचा एक जायंट' नावाचा लेख आहे. देशमुख यांनी कार्नाड यांच्या नाटकाच्या वाङ्मयीन गुणवत्ता व प्रयोगरूपाबद्दलचे काही विचार मांडले आहेत. पुराणकथांचा नवा अन्वयार्थ मांडणारी नाटके, ऐतिहासिक नाटकातून उलगडणारे आजचे वास्तव आणि एकविसाव्या शतकातील आजच्या काळाची नाटके या तीन परिप्रेक्ष्यातून कार्नाडांच्या नाटकांचे आकलन मांडले आहे. कार्नाडांच्या नाटकातील विविधस्वरूपी आशयसूत्रे, नाटककार म्हणून कार्नाडांनी पुराणकथांचा, इतिहासाचा व समकालीन वास्तवाचा लावलेला अन्वयार्थ देशमुखांनी नोंदविला आहे.

स्वातंत्र्योत्तर काळात महाराष्ट्रीय मध्यमवर्गीय समाजाची जी वाटचाल झाली, त्या वाटचालीच्या समाजशास्त्राचा आणि देशमुख यांच्या जीवनदृष्टीचा जवळचा संबंध आहे. या काळातील सुशिक्षित मध्यमवर्गीयांचे आदर्श, स्वप्नाकांक्षा तीमधून प्रत्यक्ष-अप्रत्यक्षपणे ध्वनित झाली आहे. देशमुख स्वतःला स्वातंत्र्यानंतरच्या व नव्वदीआधीच्या मधल्या काळातले प्रतिनिधी मानतात. या काळातील सामाजिक व वाङ्मयीन वातावरणाचा त्यांच्या व्यक्ती व लेखक म्हणून असण्यावर परिणाम झालेला आहे. जीवनाविषयीच्या मध्यमवर्गीयांच्या कल्पना, व्यक्तिमत्त्व रचण्यातली कल्पना व स्वतःला घडविण्यात ज्या गोष्टींचा सहभाग होता, त्याबद्दलचा आदर्शवत दृष्टिकोन तीमध्ये आहे. तसेच या काळातील शिक्षित वर्गाच्या आवडी-निवडी त्यांच्या खास अशा कल्पनांमधून साकार होत होत्या. ज्या भावगीतांनी व भावसंगीताने व हिंदी चित्रसृष्टीने या काळातील शिक्षित मनाचे पोषण केले, त्याचा आविष्कार लेखनभाषेतून झाला आहे. हिंदी गाण्यांचे, चित्रपटांचे व मराठी भावगीतांचे अनेक तपशील देशमुखांच्या लेखनात आहेत. तसेच या काळातील या समाजाची घडण ज्या माध्यमांनी, साहित्यांनी केली, त्याचाच हा आविष्कार आहे.

मुस्लीम जीवनसंस्कृतीचे चित्रण हा देशमुख यांच्या एकूण लेखनाचा आस्थेचा विषय आहे. त्यांच्या कथात्म व वैचारिक लेखनातून मुस्लीम जीवनासंबंधीचे विषय पुन्हा-पुन्हा आवृत्त झाले आहेत. भारतीय लोकजीवनाचा अविभाज्य भाग असणाऱ्या या संस्कृतीबद्दलचे कुतूहल त्यांना आहे. ते जीवन समजून घ्यावे अशी भावना तीमध्ये आहे. 'सलोमी', 'इन्किलाब विरुद्ध जिहाद' या कादंबऱ्यांत व अनेक कथांमध्ये

या जीवनाचे चित्रण आले आहे. देशमुखांच्या या संस्कृतिप्रेमामागे मराठवाड्यातील निजाम राजवटीतील लोकजीवनाचा भाग असावा. बालपणीच्या घडणकाळातील व पुढेही सेवाकाळात निजाम राजवटीतील मुस्लीम संस्कृतीच्या खाणाखुणा, त्यांच्यावरील उर्दू वाङ्मयाची सावली, भाषेची जानपेहचान त्यांमुळे त्यांना समूहजीवनाच्या अंतरंगात डोकावता आले. त्याविषयीच्या आकर्षणामुळे ते सतत त्याकडे वळले असावेत.

सामाजिक जीवनाची समस्याचित्रणे हा एक त्यांच्या लेखनाचा विशेष आहे. पाणी टंचाई, स्त्रीभ्रूणहत्या, बालमजुरी ते मुस्लीम स्त्रियांची दुःखे अशा समस्यांना तीमध्ये स्थान आहे. या प्रश्नांचा विविधांगी शोध त्यांनी ललित साहित्यातून घेतला आहे. एक जागृत लेखक म्हणून त्यांच्यात आजच्या काळाचा, समाजजीवनाचा निरीक्षक दडलेला आहे. स्वतः त्यांनी 'बखर लिहिणाऱ्या बखरकाराचा वारस आपल्यात असल्याचे' म्हटले आहे. देशमुख यांच्या साहित्यातील विविध अनोख्या समाजजीवनाची, समस्यांची ही दर्शने आहेत. अर्धशतकातील महाराष्ट्रातील काही जीवनक्षेत्रांची ही समाजवृत्ते आहेत. वार्तांकने आहेत. प्रशासनातील काही सामाजिक अहवाल आहेत. ते कथात्मसाहित्यातून मांडले आहेत. ही समाजचित्रे त्यांनी रिपोर्ताज लेखनशैलीत मांडली आहेत. त्यामुळे समाजचित्रणाच्या दृष्टीने त्यास महत्त्व आहे. थीम बेस्ड कथा हा देशमुख यांच्या कथासाहित्याचा एक वेगळा अभिनव असा महत्त्वाचा पैलू आहे. एखादे मुख्य सूत्र घेऊन त्यासंबंधीच्या सलग कथामाला लिहिल्या आहेत. एका विषयाची अनेक परिमाणे, कंगोरे शोधण्याचा हा प्रयत्न आहे. समकालीन समस्याचित्रणाच्या या विविधस्वरूपी कथामाला आहेत. या समस्यांवरील उपायही लोकशिक्षकाच्या भूमिकेतून त्यांनी या लेखनातून मांडला आहे.

देशमुख यांच्या साहित्यभाषेचे स्वरूपही वैविध्यपूर्ण आहे. मात्र जीवनानुभवाच्या आशयसूत्राच्या प्रभावी ठशामुळे काही प्रमाणात साहित्यकृतीच्या रूपाकडे दुर्लक्ष झालेले दिसते. अभिनव अशा प्रकारची भाषारूपे आहेत. थीम बेस्ड सारख्या कथारूपाचा प्रयोग आहे. कथा-कादंबरीत पत्रात्मक लेखनतंत्र आहे. बृहद कादंबरीचा आकृतिबंध 'इन्किलाब विरुद्ध जिहाद'मध्ये आहे. देशमुख यांच्या कथात्मक सृष्टीत व ललित लेखनातील पात्र रचना ही दुहेरी स्वरूपाची आहे. समस्याकेंद्री अनुभवविश्वाचे चित्रण करताना त्यांच्या साहित्यात बरीचशी पात्रे खलप्रवृत्तीची असतात. मात्र त्याचवेळी त्या संहितेत सत्शील, आदर्शवादी किंवा सकारात्मतेचा ध्यास असणारी पात्रे वा निवेदक सुप्तपणे नांदत असतो. समांतरपणाने या दुहेरी स्वरूपाच्या पात्ररचनेतील आशावादाचे व आदर्शाचे सूचन केलेले आहे. चित्रदर्शी आणि नाट्यात्म अभिव्यक्ती आहे.

एकंदरीत सामाजिक प्रश्नांची मांडणी करण्यासाठी देशमुख यांच्या साहित्यदृष्टीमध्ये नेहमी एका लोकशिक्षकाची आदर्शवादी भूमिका वसत आलेली आहे. समस्यामुक्त समाज निर्माण व्हावा या आदर्शवादी भूमिकेतून त्यांच्या साहित्याचे कथन नियंत्रित झाले आहे. या भूमिकेचा पगडा त्यांच्या जीवनचित्रणावर, पात्रसृष्टीवर व भाषेवर आहे. आदर्शवादी नायकाच्या निर्मितीतून या समाजव्यवस्थेचे निरीक्षण केलेले आहे. अंतिमतः ज्या प्रश्नांचे सूतोवाच प्रारंभिक केले आहे, त्याची दाहक वास्तवता विविध कंगोरे प्रत्ययास आणून देऊन शेवटी सकारात्मक असा केलेला असतो. तो बऱ्याच वेळेला सुखान्त स्वरूपाचा असतो. आदर्शाची व मांगल्याची आस असलेली नजर मला प्राप्त झाली आहे असे स्वतः त्यांनी म्हटले आहे. या आदर्शवादी मूल्यविवेकाची जागती नजर त्यांच्या एकूण लेखनावर आहे. म्हणून त्यांच्या साहित्यदृष्टीत आदर्शवादी युटोपियाला महत्त्वाचे स्थान आहे. त्यांचे लेखनाचे अनेक विषय या जाणीवकेंद्राने नियंत्रित झाले आहेत. निराशावादी सिनिकल वृत्ती अव्हेरून मानवी जीवनातील साफल्याचे व आशावादीपणाचे सूचन त्यांच्या वाङ्मयात आहे. यामागे कदाचित देशमुख यांच्या मनःपिंडाचा भाग असावा. कारण वाङ्मयाचा झालेला संस्कार विशेषतः खांडेकर प्रेमचंदादी मानववादी प्रेरणेचा वाङ्मयठसा तसेच जीवनाकडे सकारात्मक आशावादीपणे पाहण्याची दृष्टी यापुढे त्यांच्या साहित्याचे सादरीकरण नियंत्रित झालेले दिसते. एखाद्या प्रश्नाचा सखोल वेध घेण्याऐवजी वास्तव घटना समस्यांचे पृष्ठस्तरीय व काही वेळा ते ओलांडणारे झालेले आहे. या महिन्यातच त्यांची 'यंग ग्रुप इंडियाचा सेल्फी' ही कादंबरी प्रकाशित होत आहे. आधुनिक काळाने व नव्या अर्थनीतीने निर्माण झालेला महापेच तीमधून उलगडणार आहेत.

साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षांकडे मराठी समाज वाङ्मयाचे नेतृत्व म्हणून पाहतो. हे संमेलन बडोदानगरीत संपन्न होत आहे. त्याला अनेकार्थाने महत्त्व आहे. महाराजा सयाजीराव गायकवाड यांच्या प्रागतिक आणि सांस्कृतिक इयत्ता विस्तारणाऱ्या या नगरात हे संमेलन होत आहे. प्रशासक राज्यकर्ता म्हणून ग्रंथप्रसारासाठी व सांस्कृतिक पर्यावरणाची नवी नीती सयाजीराव महाराजांनी निर्माण केली. १९३३ साली महाराष्ट्र साहित्य संमेलन बडोदा येथे संपन्न झाले होते. ते अतिशय नियोजनबद्ध आणि वैशिष्ट्यपूर्ण झाले होते. या संमेलनातील एका परिसंवादाचे अध्यक्ष महर्षी विठ्ठल रामजी शिंदे होते. १९३२ साली महाराष्ट्र साहित्य संमेलन कोल्हापुरात संपन्न झाले होते. त्याचे अध्यक्ष होते महाराजा सयाजीराव गायकवाड. या संमेलनातील अध्यक्ष म्हणून सयाजीरावांचे

भाषण हे अत्यंत मूलभूत स्वरूपाचे होते. मराठी भाषा, साहित्य आणि संस्कृती यांसंबंधीचा नवा विचार त्यांच्या भाषणात होता. 'जीवनातले सर्व तऱ्हेचे अनुभव साहित्यात आले तर वाङ्मय समृद्ध होईल, सर्व धंद्यांच्या, सर्व वर्गांच्या व सर्व स्थळांच्या लोकांनी लिहावे नाहीतर वाङ्मय एकारलेले राहील. तसेच महानुभावीयांनी मठांच्या द्वारे मराठी धर्मग्रंथांना अटकेपार काबूलपर्यंत नेले. अठरापगड जातीच्या स्त्री-पुरुष कवींनी मराठी वाङ्मयाचा खोल पाया रचला, अशी नवी मीमांसा केली होती. या भाषणात त्यांनी असे नोंदविले होते की, 'महाराष्ट्राला सबंध तीनशे मैलांचा समुद्रकिनारा महाराष्ट्राच्या कडेला असून मच्छीमारीविषयी किंवा दर्यावर्दीपणासंबंधी एकही मराठी पुस्तक नसावे, हे आश्चर्य नव्हे काय?' अशी खंत व्यक्त केली होती. त्या पार्श्वभूमीवर साहित्य संमेलनांची अध्यक्षीय भाषणे अत्यंत सामान्य स्वरूपाची झालेली आहेत. वाङ्मय व संस्कृती व्यवहाराशी संबंधित वास्तव नवनिर्वाचित अध्यक्षांना ध्यानात घ्यावे लागणार आहे. वाङ्मयनिर्मितीचा आविष्कार नव्या संक्रमणातून जातो आहे. विज्ञान, तंत्रज्ञानाच्या अपरिमित वेगामुळे वाङ्मयाचे सारे संभाषितच बदलले आहे. 'क्षणाक्षणाला जग बदलते' असे या काळाचे वर्णन नामदेव ढसाळांनी केले आहे. त्यामुळे हा कालस्वर आणि त्यातील निर्मिती-ताण समजून घ्यावे लागणार आहेत. वाङ्मय व्यवहारातला अत्यंत महत्त्वाचा घटक म्हणजे वाचक. या वाचकाची दखल वाङ्मयीन व्यवहारात घेतली जात नाही. वाचकदेखील नव्या माध्यमाला प्रतिसाद देत आहे. त्यामुळे छापील पुस्तकांऐवजी ई-बुककडे तो संक्रमित होतो आहे. तंत्रज्ञानाच्या ह्या झालेल्या बदलामुळे वाङ्मयनिर्मिती आणि त्याचा प्रतिसाद याची नवी घडण होते आहे. तसेच साहित्यसंस्थांची एकारलेली कार्यपद्धती आणि कल्पकतेचा अभाव हा मोठ्या प्रमाणात दिसतो. त्या सक्रिय होऊ शकतील का, याचाही विचार करावा लागणार आहे. तसेच बृहन्महाराष्ट्रात ज्या साहित्यसंस्था व मराठी भाषिक समाज आहे, त्यांच्यामध्ये व महाराष्ट्रातील मराठी समाज यांच्यात भाषा संस्कृतीविषयी काही खूण बांधता येईल का, याचा विचार होणे गरजेचे आहे. वाङ्मयीन पर्यावरणांच्या खुल्या समावेश शक्यतांचा संच निर्माण होईल, अशा धोरणात्मक कृतिकार्यक्रमांची आखणी व्हावी अशी पावले उचलता आल्यास पाहावे. त्यामुळे या साऱ्या वाङ्मय संस्कृतिचिंतनाला या कार्याची अपेक्षा केल्यास ते वावगे ठरू नये. त्यांच्या कार्याला व अध्यक्षीय कारकिर्दीला शुभेच्छा..! ■

**रणधीर शिंदे**
२०४, प्रथमेश अपार्टमेंट, राऊत कॉलनी,
अंबाई डिफेन्स, कोल्हापूर, ४१६००८.
चलभाष : ९८९०९१३०३१
इ-मेल : madhurang76@yahoo.co.in

---

## भावपूर्ण श्रद्धांजली!



**महाराष्ट्र साहित्य परिषदेचे निष्ठावंत कार्यकर्ते आणि साहित्य पत्रिकेचे माजी संपादक वसंत जोशी यांचे दि. १६ नोव्हेंबर २०१७ रोजी दुःखद निधन झाले. त्यांनी १९८५-१९८८ या काळात साहित्य पत्रिकेचे संपादक म्हणून काम पाहताना विविध विशेषांकांचे संपादन केले. 'भाषा व साहित्य : संशोधन' (खंड १ ते ३) या ग्रंथांचे त्यांनी साक्षेपी संपादन केले. त्यांना महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे भावपूर्ण श्रद्धांजली!**

वसंत स. जोशी यांच्याबद्दल थोडेसे : रा. ग. गडकरी विशेषांक, साहित्यसंस्था विशेषांक, श्री. म. माटे विशेषांक, गझल विशेषांक अशा विशेषांकासह एकूण तेरा अंकांचे संपादन वसंत जोशी यांनी केले. साहित्यसंस्था विशेषांकात साहित्य महामंडळ, साहित्य अकादमी, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, महाराष्ट्र साहित्य परिषद, मराठवाडा साहित्य परिषद इ. साहित्यसेवेला वाहून घेतलेल्या संस्थांचा परिचय करून दिला आहे. गझल विशेषांकात तात्त्विक चर्चेबरोबरच आजची गझल या सदरात ज्येष्ठ कवी सुरेश भट यांच्यासह अनेक नवोदित कवींच्या गझल रचना दिल्या आहेत. दलित साहित्य विशेषांकात मराठी दलित साहित्याबरोबरच कन्नड, गुजराती, हिंदी, बंगाली, मल्याळम् भाषांतील दलित साहित्याच्या स्वरूपाची चर्चा करून निवडक दलित कथा, कविता या अंकातून आल्या आहेत. बऱ्याच काळानंतर प्रासंगिक कारणाने दलित साहित्याला परत पत्रिकेत स्थान मिळाले आहे. श्री. म. माटे विशेषांकातून माटे यांचा वाङ्मयीन व चरित्रात्मक परिचय करून देणारे लेख आहेत. त्यांनी संपादित केलेल्या अंकातून निवडक ग्रंथपरीक्षणे, मध्ययुगीन-आधुनिक वाङ्मय समीक्षा-संशोधन, द.न.गोखले यांचे भाषाशोधन सारखे सदर समाविष्ट झालेले आहेत. परिषदवार्ता, संपादकीय यातून प्रासंगिक घटनांचा वेध घेतलेला आहे.



अनुक्रमणिका



भाषण

## रंगनाथ पठारे

त्रहो,

या निमित्ताने आपल्यासमोर काही विचार मांडण्याची संधी दिल्याबद्दल मी संयोजकांचे आभार मानतो. संयोजक म्हणताना मला श्री. जयंत येलुरकर, त्यांचे सहकारी आणि पुण्याच्या म.सा.प.चे पदाधिकारी यांचा निर्देश करावयाचा आहे. त्यांना पृष्ठदर्शी प्रतिकूल वाटतील अशा माझ्या काही प्रतिक्रिया; अनेक बाबतीत त्यांच्यासंबंधी आणि त्याचा संबंध असलेल्या अनेक उपक्रमांसंबंधी जाहीर असताना त्यांनी मला या ठिकाणी बोलावले आहे, म्हणून मी त्यांचा आभारी आहे. मी जे काही बोलत असतो, त्याच्यापाठी मला आपल्या भाषा आणि संस्कृतीविषयी वाटणारा जिव्हाळा कारक असतो, याची सत्यता त्यांना जाणवलेली आहे, असा याचा मी अर्थ घेतो. आपल्या अहमदनगर जिल्ह्याशी मी माझ्या जन्मापासूनच बांधला गेलेलो आहे, याचा मला फार अभिमान वाटतो. याच जिल्ह्यातल्या पारनेर तालुक्यातील जवळे नावाच्या गावात माझा जन्म झाला. जवळे, अहमदनगर आणि पुणे इथे मी शिकलो. संगमनेर इथल्या एका महाविद्यालयात सदतीस वर्षे काम केले. माझ्या आयुष्याचा बव्हंशी सगळा काळ मी या जिल्ह्यातच घालविला आहे. माझ्या लेखनाचे सारे सत्त्व याच भूमीने मला पुरविलेले आहे. ख्रिस्ती मिशनरी लोकांनी अत्यंत सेवाभावी वृत्तीने चालविलेल्या अहमदनगर महाविद्यालयात मी शिक्षण घेतले आहे. धर्मप्रसारापेक्षा 'शहाणे करूनी सोडावे सकल जन' या व्रताचा अंगीकार केलेल्या त्या महाविद्यालयाने या जिल्ह्यातील आणि आसपासच्या मराठवाड्यातील अनेक बहुजन विद्यार्थ्यांच्या पिढ्या घडविलेल्या आहेत. आयुष्यभर पुरून उरावे असे सांस्कृतिक संचित त्या महाविद्यालयाने माझ्यासारख्या अनेकांना पुरविलेले आहे. शैव, साधक, नाथसंप्रदायी संत, महानुभावी महात्मे यांच्या निवासाने आणि कार्याने ही भूमी पावन झालेली आहे. संत ज्ञानेश्वरांपासून शेख महंमद, निळोबाराय पिंपळनेरकर ते सकलसंतगाथा लिहिणारे महिपतीबुवा ताहराबादकर यांच्यापर्यंत अनेक महानुभाव इथे होऊन गेलेले आहेत. तशीच कवी अनंत फंदी यांच्यापासून ते सेनापती बापट अशी यांच्यासारखी अनेक नावे सांगता येतील. दोन हजार वर्षांआधी संपूर्ण भरतखंडावर जवळपास सलग चारशे वर्षे राज्य करणाऱ्या सातवाहन या महाराष्ट्री राजकुलानंतर महाराष्ट्री लोकांना दीर्घ स्मृतिभ्रंशाने ग्रासलेले होते. औरंगाबादजवळच्या वेरूळ येथील पाटलांच्या घराण्यात जन्मलेल्या छत्रपती शिवाजी राजाने आपल्याला त्यातून जागे केले. या राजासाठी तशी भूमी तयार



**माझ्या देशाच्या लोकशाही परंपरेवर माझा भरवसा आहे. आधुनिक काळातील लोकशाही येण्याच्या आधी सुद्धा आपल्या इथे लोकांचे काय म्हणणे आहे, हे जाणून घेण्याची प्रथा दीर्घ काळ होती. म्हणूनच लोकशाही ही आपल्यासाठी काही नवी गोष्ट नाहीय. आणि तिला चिरडण्याच्या गोष्टीदेखील आपल्याला नव्या नाहीत. त्या सगळ्यांना पुरून उरलेले लोक आपण आहोत याचा मला फार अभिमान वाटतो. आपण कायमच प्रश्न उपस्थित करणारे लोक राहिलेलो आहोत. आपल्या अशा वृत्तीचा आपल्या सामाजिक व्यवस्थेने सहसा पुरस्कारच केलेला आहे. जेव्हा ते आपल्याला जमले नाही, तेव्हा इथल्या भद्र वर्गाचे हितसंबंध राखण्यासाठी त्या भद्र लोकांनी परकीयांना आमंत्रण दिलेले आहे. आणि त्यांना इथे राज्य करता यावे अशा सोयी प्रदान केलेल्या आहेत.**



करण्याचे महत्त्वाचे काम मलिक अंबर या अहमदनगर येथील निजामशाही राजवटीतील एका सरदाराने केले. मलिक अंबर हा हबशी गुलाम. हबशी म्हणजे ॲबिसिनिया देशातला. हल्लीच्या इथिओपियामधला. स्वतःच्या कर्तबगारीच्या जोरावर तो गुलामीतून मुक्त होऊन सरदार झाला होता. याने मराठा सरदारांमध्ये एकजूट व्हावी यासाठी जाणीवपूर्वक प्रयत्न केले. शहाजी आणि जिजाबाई यांचे लग्न होण्यासाठी- भोसले आणि जाधव यांच्यात सोयरिक होण्यासाठी- त्याने मर्यादातिक्रम करून प्रयत्न केले. गनिमी काव्याच्या युद्धतंत्राचा पाया यानेच घातला. त्याचा छत्रपती शिवाजी राजाने नंतर खूप विस्तार केला. अहमदनगरच्या या हबशी गुलाम सरदाराने आपल्यातले मराठीपण जागे केले. आपल्याला आपल्यातल्या सामर्थ्याची जाणीव करून दिली. आपला स्मृतिभ्रंश नाहीसा केला, तो होण्यासाठीचा पाया घातला, ही फार मोठी गोष्ट आहे. या ॲबिसिनियन किंवा इथिओपियन लोकांशी असलेला आपला संपर्क अधिक जुना, बराच प्राचीन असला पाहिजे, असे मला वाटते. अजिंठा येथील चित्रातील स्त्रिया आपण जवळून जरा बारकाईने पाहिल्या तर त्या आजच्या इथिओपियन स्त्रियांसारख्या सुंदर, तशीच चेहऱ्याची ठेवण असलेल्या दिसतात. तेव्हाचे काही कलाकार इथिओपियन होते की काय, याचा शोध तज्ज्ञांनी घ्यावा, इतके ते साहजिक वाटण्याजोगे आहे. नगर जिल्ह्याच्या आणखी एका वैशिष्ट्याची नोंद घेणे मला आवश्यक वाटते. त्याचा संबंध इथल्या लोकांच्या सहकारी वृत्तीशी आहे, तसाच तो शिक्षणाच्या संबंधीच्या अनिवास आस्थेशी आहे आणि तो आपल्या लोकांच्या लढाऊ वृत्तीशीसुद्धा आहे. महाराष्ट्रातील आधुनिक सहकारी साखर कारखानदारीचा पाया पद्मश्री विठ्ठलराव विखे पाटील यांनी लोणी येथे साखर कारखाना करून घातला हे सर्वश्रुत आहे. ते नुसत्या साखर कारखानदारीवर थांबले नाहीत. जीवनाच्या सगळ्या क्षेत्रात या वृत्तीने शिरकाव केला. ही चळवळ फोफावली. तिच्यात आज शिरलेल्या काही अनिष्ट प्रवृत्तींसकट ही महाराष्ट्राच्या जीवनात परिवर्तन घडविणारी मोठी चळवळ आहे. कर्मवीर भाऊराव पाटील यांनी जनसामान्यांच्या शिक्षणासाठी सातारा जिल्ह्यात सुरू केलेल्या कार्याला तिथल्यापेक्षा खूप अधिक प्रतिसाद, अगदी पुणे जिल्हा ओलांडून आपल्या नगर जिल्ह्याने दिला. जनसामान्यांच्या कल्याणाच्या गोष्टी करणाऱ्या सगळ्या डाव्या चळवळींना इथे नेहमीच वाव मिळाला. हे सगळे असे का आहे? याचे मूळ कशात आहे? या जिल्ह्यातल्या लोकांत हे कुठून आले, हा एक सामान्य माणूस म्हणून मला कायमच पडलेला प्रश्न होता. याचे- निदानपक्षी अंशतः तरी- उत्तर मला या जिल्ह्याचे गॅझेटियर वाचताना मला दिसले. त्यातल्या काही नोंदी अशा -

'१८०२मध्ये होळकरांच्या सैन्याने नगर जिल्हा बेचिराख करून टाकला होता. १८०३-०४या वर्षांत भयंकर दुष्काळ पडला. लोक घरेदारे सोडून गेले. गावे ओस पडली. काही लोक मोठ्या गावांमधल्या किल्ल्यांमध्ये आश्रयाला जात. अहमदनगरच्या किल्ल्याभोवती खंदक खोदण्याच्या कामाला

## "लेखकाने आपले आंतरिक स्वातंत्र्य प्राणपणाने जपावे!"














जनरल वेलस्ली याने यावेळी सुमारे ५०००पेक्षा जास्त मजूर लावलेले होते. भिल्ल व तत्सम रानटी लोक मैदानी भागात येऊन अतोनात लूट व क्रूर कृत्ये करीत. पेंढाऱ्यांचे हल्लेही वाढले होते. भिल्लांच्या बंदोबस्तासाठी आधी दुसऱ्या बाजीरावाने खानदेशाचा सुभेदार बाळाजी लक्ष्मण याची योजना केली होती. मनोहरगीर गोसावी या आपल्या माणसामार्फत त्याने असंख्य भिल्लांना कोरपगाव येथे गोदावरीकाठी बोलावले व निर्घृणपणे त्यांची हत्या करून त्यांची प्रेते विहिरींमध्ये टाकली. त्यामुळे काही काळ बंदोबस्त झाला. पुन्हा १८०६मध्ये तशीच बेशिस्त आणि गोंधळ चालू राहिला. त्रिंबकजी डेंगळे याने शेवगाव तालुक्यातील घेवडी-चांदगाव येथे पुन्हा एकदा असाच भिल्लांच्या सामुदायिक हत्येचा कार्यक्रम घडवून आणला. त्यासाठी त्याने नारोबा पाटील नामक इसमाची योजना केली. पाच ते सहा हजार घोडी व बरेच मोठे पायदळ त्याच्या दिमतीला देण्यात आले होते. दिसतील ते भिल्ल आणि तत्सम यांची नारोबाने सर्रास कत्तल उडवली. पंधरा महिन्यांत सुमारे पंधरा हजार माणसे कापली गेली, असे म्हणतात. अहमदनगरच्या दक्षिणेकडचा काही सुपीक पट्टा सोडता बाकी सारीकडे निर्जन गावे सुमारे १८१८पर्यंत होती. १८१८साली पेशव्याच्या फौजेचा सेवनी येथे पराभव झाला. तेव्हा पेशव्यांच्या फौजेतील अनेक पराभूत घोडेस्वार योद्धे अहमदनगर जिल्ह्यातल्या निर्जन मुलखात येऊन वसती करू लागले. ही गोष्ट त्या वेळचा अहमदनगर येथील कलेक्टर लेफ्टनंट हेन्री पॉटिंजर म्हणून जो होता, त्याने तेव्हाचा दख्खनचा कमिशनर एल्फिन्स्टन याला कळवली आणि सूचना मागवल्या. त्यावर एल्फिन्स्टन याने त्यास कळवले की, पॉटिंजर याने अशा लोकांना उत्तेजन द्यावे व चांगली वागणूक द्यावी. त्याप्रमाणे पॉटिंजर याने व्यवस्था केली. पॉटिंजर हा एल्फिन्स्टन याचा मित्र आणि त्याच्या विश्वासातला होता. तो १८२५पर्यंत कलेक्टर होता.

१९ ऑगस्ट १८२१ : अहमदनगरच्या जेलमधील कैद्यांनी सुरक्षा कर्मचाऱ्यांवर हल्ला करून त्यांची हत्यारे हस्तगत केली. काही कैदी पळून गेले. बाकीच्यांनी किल्ला बंद करून फौज येईपर्यंत तो लढवला. फौजेने केलेल्या हल्ल्यात २९ कैदी मारले गेले. ६२ जखमी झाले. नंतर शांतता प्रस्थापित झाली.

१९ ऑगस्ट १८२२ : सांगलीचे संस्थानिक चिंतामणराव पटवर्धन यांचा सेवक नरसिंगराव याच्या जबानीवरून शिबंदी जमा करण्याचा एक कट उघडकीस आला. ही शिबंदी शिंदे यांची गावे- बेलापूर, सोनई, ब्राह्मणी, जामगाव आणि नंदुरबार (खानदेश) येथे जमविण्यात येणार होती. जी नंतर लासूर येथे एकत्र येणार होती. खेरीज हिंदुस्थानच्या अनेक भागात आणखी कुमक गोळा केली जाणार होती. ती घेऊन ब्रिटिश ठाण्यांवर हल्ले करण्याची त्यांची योजना होती.

अशाच आणखी पुष्कळ नोंदी रामजी भांगरे, गोविंदराव खाडी, राघोजी भांगरे, भागोजी नाईक या अकोले तालुक्यातील कोळी योद्ध्यांसंबंधी आहेत. १८७५मध्ये पारनेर, कर्जत, श्रीगोंदे आणि नगर भागातील दुष्काळग्रस्त शेतकऱ्यांनी झुंडीने सावकारांवर हल्ले केल्याच्या २२ घटना घडल्या. त्या वेळी त्या भागातील ब्राह्मण कुलकर्णी यांनी ब्रिटिशांना सल्ला दिला होता की, या बंडखोर शेतकऱ्यांवर सैन्य पाठविण्यापेक्षा त्यांच्या मागण्यांकडे, त्यांच्या हालअपेष्टा संपविण्याकडे ब्रिटिशांनी लक्ष द्यावे.

यातून या जिल्ह्यातल्या लोकांविषयी काही गोष्टी स्पष्ट होतात. हे लोक प्रामुख्याने फौजी लोकांचे वंशज आहेत. ते अठरा पगड जातीतले आहेत. ते महाराष्ट्राच्या- आणि कदाचित देशाच्या- अनेक भागातून आलेले आहेत. ते योद्धे होते. म्हणून त्यांच्यात काही एक शिस्त होती. इथल्या सहकाराचा उगम त्यात आहे. ते दुनिया हिंडलेले होते. त्यांनी नजर उघडी झालेली होती. ही गोष्ट त्यांच्या शिक्षणाच्या आस्थेविषयीचे स्पष्टीकरण देते. त्यांची लढाऊ वृत्ती कधीच संपली नाही. अन्यायाचा प्राणपणाने प्रतिकार करणे त्यांच्या स्वभावात होते आणि आहे. असो. अशा अनेक गोष्टींसाठी मी या लोकांत जन्मलो याचा मला अभिमान वाटतो.

आता नगर जिल्ह्यातून बाहेर साहित्य आणि संस्कृतीकडे.

साहित्याच्या साऱ्या गोष्टी भाषा, संस्कृती यांच्याशी आणि त्यांच्या वर्तमानाशी संबंधित असतात. म्हणूनच त्या आपल्या व्यक्तिगत आणि सामूहिक जगण्याच्या व्यापक घडामोडींचा भागही असतात. म्हणजे एक व्यक्ती म्हणून- आणि समूह म्हणूनही- आपले आजचे जे वर्तमान आहे, ते या ना त्या प्रकारे साहित्याच्या निर्मितीस कारण होत असते. म्हणूनच वर्तमानाचे अस्सल भान ठेवणे आणि किमान मनातल्या मनात तरी त्याला प्रतिक्रिया देत राहणे ही साहित्याच्या निर्मितीची अगदी प्राथमिक अट आहे. कारण साहित्याची निर्मिती ही जगण्याच्या प्रक्रियेला प्रतिक्रिया देण्याच्या ज्या अनेक रीती असतात, त्यातील एक मौल्यवान रीत असते. आणि तिची मौलिकता ही अनुभवाचे आंतरिकीकरण करण्याची क्षमता, व्यक्त होण्याची असोशी, दंश करून घेण्याची रीत अशा आणि यांसारख्या अनेक घटकांवर अवलंबून असते. हल्ली पुष्कळ ज्ञानी लोक असे म्हणू लागले आहेत, की अहो! साहित्य आता पोस्ट मॉडर्न झालेय अन् तुम्ही ह्या कसल्या दंश

भालचंद्र नेमाडे हे आपल्या भाषेतले आणि आपल्या देशातले एक श्रेष्ठ लेखक आहेत. त्यांचे ज्ञानपीठ पुरस्कार विजेते असणे हा या वास्तवाचा एक बारका अनुषंग आहे असे मी मानतो. त्यांना दिल्या गेलेल्या धमक्या आणि त्याच्या परिणाम त्यांना सोसावा लागलेला भावनिक आणि मानसिक ताप यांचा तर मी स्वतः साक्षी होतो आणि आहे. सरकारी, निमसरकारी आणि सरकारपुरस्कृत असूनही कायदा करून स्वायत्त ठेवलेल्या अनेक साहित्य आणि संस्कृतीविषयक संस्था यांच्या कामात आजचे सरकार ज्या अमानुष अडाणीपणे हस्तक्षेप करत आहे, ते अत्यंत धोकादायक आहे.



वगैरेच्या गोष्टी करताय? आता, साहित्य पोस्ट मॉडर्न होण्यासाठी एक भाषिक समाज म्हणून आपण तसे होणे आवश्यक आहे, हे तर ज्ञानी लोकसुद्धा मान्य करतील. जिथे आपण पुरेसे मॉडर्नसुद्धा नीट अजून झालेलो नाही, तिथे ह्या पोस्टमॉडर्नच्या वाता फिजूल आहेत, असे मी मानतो. अन् तसे झालेले लोक हे अधिक पुढारलेले आहेत, असे मानणेसुद्धा भ्रम ठरू शकते, असे मला वाटते आणि अगदी ज्ञानी लोकांचे म्हणणे खरे मानायचे ठरले तरी लेखकासाठी ही दंशाची गोष्ट कायमच आवश्यक राहते, हे लक्षात घेतले पाहिजे. ती आधुनिकता आणि उत्तरआधुनिकता यांच्या पल्याड स्वतंत्र अशी गोष्ट आहे. आपल्या वर्तमानाविषयीची सजगता संपली की लेखक संपतो. त्या स्थितीत तो लिहायला उद्युक्त कसा होणार? अन् त्याने लिहिले तरी ते मौलिक होण्याच्या शक्यतेपासून कोसो दूरच राहणार, यात काय तो संशय? एक लेखक म्हणून माझ्या वर्तमानातील झळांची उकल करण्यासाठी गरज पडली तर मी काळात अवश्य मागे पुढे जाईन. पण झळांचे मूळ तर माझ्या वर्तमानातच असते ना! आणि कोणतेही अर्थपूर्ण आणि घनसर लेखन करताना लेखकाला/कवीला काही एक जोखीम ही पत्करावीच लागत असते. मी आपल्याला 'पाश' नावाच्या पंजावमधल्या कवीचे उदाहरण देतो. 'सबसे खतरनाक होता है सपनोंका मर जाना' अशा ओळी लिहिणाऱ्या आणि आपली भारतीयता हे सर्वश्रेष्ठ मूल्य मानणाऱ्या या कवीला मारण्याचा त्या काळातील खलिस्तानी मंडळींनी चंग बांधलेला होता. या कवीला मरण्याची बिलकूल इच्छा नव्हती. जिवंत राहून आपल्याला जे म्हणायचे आहे, ते म्हणण्याचा लोकशाहीतील निसर्गदत्त अधिकार त्याला बजावायचा होता, पण आपले म्हणणे मांडत असताना प्रत्यक्ष जीवनात जगण्यासाठी त्याला खूप पळापळ करावी लागली होती. देश-विदेशात राहावे लागले होते. तो भेकड नव्हता. कारण तसे करताना, दहशतीच्या त्याही स्थितीत, तो आपले म्हणणे सोडत नव्हता. अखेर खलिस्तानी लोकांनी त्याला पाळत ठेवून, टारगेट करून मारले. त्यातून त्याला स्वतःला वाचविता आले नाही. जगण्यातील झळांचा दंश या प्रकारे मरणाला सामोरे जाण्याची जोखीम पत्करण्याचे बळ लिहिणाऱ्याला देत असतो. एक लिहिणारा म्हणून त्याचे मूल्य माझ्यासाठी असाधारण आहे.

म्हणूनच मला माझे आजचे वर्तमान कसे आहे, याचा धांडोळा घेणे आवश्यक वाटते. ज्याला मी माझे वर्तमान म्हणतो ते माझे, तुमचे- आपल्या सगळ्यांचे- वर्तमान असण्याची शक्यता आहे किंवा मी मांडतो ते प्रश्न आपल्यापैकी अनेकांचे प्रश्न असू शकतात. माझ्या वर्तमानात माझे समानधर्मा तत्त्वतः लाखो-करोडो असू शकतात. त्यांच्या तसे असण्याचा मला फार आधार वाटतो. मी ह्या आधार वगैरेच्या गोष्टी करतो म्हणजे मी घाबरलेलो आहे असे कदाचित आपणास वाटत असेल. मला असे वाटते की, मी घाबरलेलो नाहीय. पण मला चिंता वाटते. मला काळजी वाटते. काही काळाआधी अशा लोकांना 'चिंतातूर जंतू' म्हणण्याचा प्रघात होता. मी त्या प्रकारचा माणूस आहे असे मला वाटत नाही. हे असे beating around the bush करण्यापेक्षा मी स्पष्ट शब्दांत थेट ते मांडतो. माझ्या देशाच्या लोकशाही परंपरेवर माझा भरवसा आहे. आधुनिक काळातील लोकशाही येण्याच्या आधी सुद्धा आपल्या इथे लोकांचे काय म्हणणे आहे, हे जाणून घेण्याची प्रथा दीर्घ काळ होती. म्हणूनच लोकशाही ही आपल्यासाठी काही नवी गोष्ट नाहीय. आणि तिला चिरडण्याच्या गोष्टीदेखील आपल्याला नव्या नाहीत. त्या सगळ्यांना पुरून उरलेले लोक आपण आहोत याचा मला फार अभिमान वाटतो. आपण कायमच प्रश्न उपस्थित करणारे लोक राहिलेलो आहोत. आपल्या अशा वृत्तीचा आपल्या सामाजिक व्यवस्थेने सहसा पुरस्कारच केलेला आहे. जेव्हा ते आपल्याला जमले नाही, तेव्हा इथल्या



अनुक्रमणिका

भद्र वर्गाचे हितसंबंध राखण्यासाठी त्या भद्र लोकांनी परकीयांना आमंत्रण दिलेले आहे. आणि त्यांना इथे राज्य करता यावे अशा सोयी प्रदान केलेल्या आहेत. आधुनिक काळात महात्मा गांधींचा उदय होण्याच्या आधीपर्यंत अगदी दीर्घकाळ आपण एक प्रकारे एका स्मृतिभ्रंशात जगत होतो. गांधीजींनी आपल्याला एक समूह म्हणून प्रश्न विचारणे पुन्हा शिकवले. किंवा मुळात आपल्यात जे होते, त्याचे त्यांनी पुनर्जीवन केले. मी आपल्याला म्हणताना आपल्या सामान्य माणसांविषयी बोलतो आहे, जो आपल्या अस्तित्वाचा कष्टकरी कणा आहे. आधुनिक काळात गांधीजींनी सामान्य माणसाला घडामोडींच्या केंद्रस्थानी आणून उभे केले आणि सांगितले की बाबा, जे काही चालले आहे, ते हे हे आणि असे असे आहे. तुला त्याबद्दल काय म्हणायचे ते म्हण. आपला सामान्य माणूस त्याला जे बोलायचे ते ते बोलला. आपले व्यक्त होण्याचे स्वातंत्र्य हा आपल्यातल्या या श्रेष्ठ लोकशाही मूल्याचा परिपाक आहे. याच्या बळावर एक भारतीय बहुभाषी समूह म्हणून आपण नुसतीच तग धरलेली नाही तर अनेक अंगांनी आपला भौतिक, भावनिक आणि मानसिक विकास केलेला आहे. सगळ्या प्रकारच्या अभिव्यक्तीचे स्वातंत्र्य मुबलक उपलब्ध असल्याने अनेक कल्याणकारी संस्थांची उभारणी आणि विकास आपण करू शकलो आहोत.

स्वातंत्र्यानंतरच्या गेल्या एवढ्या वर्षांत कायमच या आपल्या Silent majority ने आपल्याला काय हवे ते फार जबाबदारीने सांगितले आहे. आणि जे व्हायला हवे ते करण्यासाठी याच लोकांनी त्याच प्रकारे म्हणजे मागे मागे राहून विनातक्रार कष्ट करत- फार त्याग केलेला आहे. औपचारिक शिक्षणाचा अभाव असण्याच्या काळात आपल्या जनसामान्यांनी ते केले आहे, हे मला एक भारतीय म्हणून अभिमानास्पद वाटते.

या पार्श्वभूमीवर आपले आजचे सामाजिक, सांस्कृतिक आणि राजकीय वर्तमान कसे आहे? अगदी एका वाक्यात सांगायचे तर ते भय निर्माण करणारे आहे. असे बघा, नरेंद्र मोदी या देशाचे पंतप्रधान झाले आहेत याला माझा आक्षेप नाही. आपल्या ज्या काही बऱ्यावाईट असेल त्या लोकशाही व्यवस्थेने त्यांना त्या जागी बसविलेले आहे. ज्या प्रकारच्या विचारधारेचा ते पुरस्कार करतात, ती मला मान्य नाही. विचारांच्या अंगाने मी तिच्या दुसऱ्या टोकावर उभा आहे, पण माझ्या देशाच्या लोकशाही व्यवस्थेने त्यांना शीर्षस्थानी आणलेले आहे तर त्याचा एक नागरिक म्हणून मी आदरच केला पाहिजे. आणि तो मी करतो. या देशात लोकशाही आहे म्हणूनच एक तेली किंवा त्यासदृश जातीतील मनुष्य शीर्षस्थानी जाऊ शकलेला आहे, ही आपल्याला अभिमान वाटावी अशीच गोष्ट आहे. पण म्हणून ते जे करीत आहेत, किंवा त्यांच्या या कारकिर्दीत जे घडते आहे, त्याच्याविषयी प्रश्न करण्याचा माझा अधिकार गमविण्याची माझी तयारी नाही. आपल्यापेक्षा वेगळे मत असलेल्या इसमाला नेल्सन मंडेला एकदा म्हणाले होते, तुझे म्हणणे भले मला मान्य नसेल, पण तुझ्या ते मांडण्याच्या अधिकाराचा मी प्राणपणाने पुरस्कार करतो. लोकशाहीत या प्रकारे विविध स्वरांना मुक्तपणे व्यक्त होण्याचे स्वातंत्र्य अपेक्षितच असते. असे, या प्रकारचे आपले स्वातंत्र्य आज प्रश्नांकित झाले आहे. किंवा, खरे तर ते धोक्यातच आले आहे असे दिसते. अगदी पारतंत्र्याच्या काळात सुद्धा बाळ गंगाधर टिळक हे 'सरकारचे डोके ठिकाणावर आहे काय?' असे शीर्षक असलेला लेख 'केसरी'मध्ये लिहू शकत होते. आज आपल्या सगळ्या प्रकारच्या प्रसारमाध्यमांनी सत्ताधारी सरकारपुढे नांगी टाकलेली आहे. दादरी येथे काय झाले हे आपल्याला माहीत आहे. अशाच प्रकारच्या अनेक गोष्टी किंवा घटना राजस्थान, उत्तरप्रदेश आणि इतरत्र भरपूर झालेल्या आहेत. (महाराष्ट्र याला अपवाद आहे असे नाही. अगदी आपला पुरोगामी म्हणविला जाणारा नगर जिल्हाही त्याला अपवाद नाही. आपल्या जिल्ह्यातील कोणत्याही राज्यकर्त्याने इथे झालेल्या अनेक घटनांचा जाहीर निषेध केल्याचे माझ्या ऐकिवात नाही.) अशा घटना घडून गेल्यावर खूप उशिरा पंतप्रधान त्यांचा गुळमुळीत निषेध करतात. कायदा हातात घेतलेल्या लोकांना शासन करण्यासाठी पावले उचलली जात नाहीत. अगदी अलीकडे गुजरातमध्ये एक दलित मुलगा गरबा बघायला गेला म्हणून त्याला काही सवर्णांनी ठार केले आहे. आणखी एका दलित मुलाला तो मिशा ठेवतो म्हणून धमकावण्यात आले आहे, मारण्यात आलेले आहे. आता, मिशा राखणे ही कोणत्याही जातीची मिरासदारी नाहीय. आपले रानडे, गोखले, टिळक, आगरकर मिशा ठेवत होते. हल्ली रामोशी, बेरड आणि तत्सम जातीचे लोक मिशा ठेवतात. बाकी आपल्या मराठ्यांसकट सगळे श्मश्रू ठेवून गुळगुळीत राहण्यात धन्यता मानतात. तो समजा ज्याचा त्याचा प्रश्न. पण गरिबाने मिशा ठेवण्याची हौस केली तर त्याला कायदा हातात घेऊन झुंडीने मृत्युदंड द्यायचा याला काय म्हणायचे? आज दलित आणि मुस्लीम यांना टार्गेट करून धमकावण्याच्या आणि मारण्याच्या घटना वाटत आहेत. हे आधीच्या काँग्रेस राजवटीत घडत नव्हते असे मला म्हणायचे नाहीये. फरक एक आहे की, असे

करणाऱ्या लोकांचा आत्मविश्वास आता फार वाढला आहे. आपला पक्ष आता सत्तेत आहे आणि बाकी कोणीही आपल्याला काहीही करू शकत नाही असा काही लोकांचा समज झालेला आहे. तो दूर करण्यासाठी पंतप्रधान खूप उशिरा काही दुबळ्या औपचारिक गोष्टी बोलतात. पण बोलतातच फक्त. त्याला हिंग लावून सुद्धा किंमत द्यायची नाही, त्याची आवश्यकता नाही, असा कायदा हातात घेणाऱ्या लोकांचा समज होतो आहे. महाराष्ट्र आणि कर्नाटक या राज्यांमध्ये अलीकडच्या काळात ज्या कार्यकर्त्यांच्या हत्या झालेल्या आहेत, त्यांचा तपास दीर्घ काळ गेला तरी लागत नाही, हे काय आहे? भालचंद्र नेमाडे हे आपल्या भाषेतले आणि आपल्या देशातले एक श्रेष्ठ लेखक आहेत. त्यांचे ज्ञानपीठ पुरस्कार विजेते असणे हा या वास्तवाचा एक बारका अनुषंग आहे असे मी मानतो. त्यांना दिल्या गेलेल्या धमक्या आणि त्याच्या परिणाम त्यांना सोसावा लागलेला भावनिक आणि मानसिक ताप यांचा तर मी स्वतः साक्षी होतो आणि आहे. सरकारी, निमसरकारी आणि सरकारपुरस्कृत असूनही कायदा करून स्वायत्त ठेवलेल्या अनेक साहित्य आणि संस्कृतीविषयक संस्था यांच्या कामात आजचे सरकार ज्या अमानुष अडाणीपणे हस्तक्षेप करत आहे, ते अत्यंत धोकादायक आहे. इतिहासाची मांडणी आणि त्याचे वाचन यांच्यामध्ये याच प्रकारचा हस्तक्षेप होतो आहे. शेजारी पाकिस्तान देशात इतिहासाची मूर्ख मांडणी करताना ते पाकिस्तान हा देश मुहम्मद बिन कासीम इसवी सनाच्या सातव्या शतकात इकडे आला तेव्हापासून निर्माण झाला, असे अभ्यासक्रमाच्या पुस्तकात सांगतात. १९४७पर्यंत भारत हा पाकिस्तानचा भाग होता असे सांगतात. आपण आज ज्या प्रकारे इतिहासात हस्तक्षेप करू बघत आहोत, ते यापेक्षा फार वेगळे नाहीये. कारण ऐतिहासिक वास्तवापेक्षा काही एक धारणा बाळगणाऱ्या वर्गाला सोयीचा वाटणारा 'सिलेक्टिव्ह' इतिहास आपण आपल्या पाठ्यपुस्तकात टाकण्याचा प्रयत्न करत आहोत. भारत नावाचे जे एक बहुभाषिक आणि बहुसांस्कृतिक वास्तव आहे, त्याच्यात इतिहासाची अशी परंपरा नाहीय. आधी 'हा जय नावाचा इतिहास आहे' असे नाव असलेल्या आणि नंतर 'महाभारत' या नावाने रूढ झालेल्या सगळ्या भरतखंडाला अनेक पिढ्या बांधून ठेवणाऱ्या महाकाव्यात सुद्धा बऱ्यावाईट, सुष्ट आणि दुष्ट अशा सगळ्या मांडणीत अर्थांचे आणि मूल्यनिर्णयाचे सगळे पदर खुले राहतील अशी काळजी घेण्यात आलेली आहे. पांडव सुष्ट आणि कौरव दुष्ट अशी वरवर मांडणी असली तरी कौरवांच्या बाजूने विचार करता त्यांचे काहीही चुकलेले नाहीये. दुर्योधनाचे म्हणणे त्याच्या अंगाने विचार केला तर पटू शकेल असेच आहे, अशी खुली मांडणी आहे. आणि पांडवांनी मिळविलेले विजय धर्मयुद्धाचे नियम उल्लंघून मिळविलेले आहेत असे प्रतिपादन करायला वाव आहे. इतिहास हा जेत्याच्या बाजूचा आहे असे म्हणता म्हणता तो अत्यंत संयत प्रकारे कोणाचीही बाजू न घेता मांडण्याचा आदर्श व्यासांनी या महाकाव्यात आपल्याला घालून दिलेला आहे. अर्थनिर्णयन त्यांनी वाचकांवर सोडलेले आहे. आपल्यामधली संयत आणि समंजस दृष्टी यांचा पाया या महाकाव्याने घातलेला आहे असे म्हणणे फार चुकीचे होणार नाही. पण आज आपण तिथून एका वेगळ्या, अडाणी आणि अत्यंत चुकीच्या दिशेने जाऊ पाहत आहोत, हे सांगण्याची वेळ आलेली आहे. जी गोष्ट भौतिक इतिहासाची ती किंवा तशीच आपल्या वैज्ञानिक इतिहासाच्या मांडणीची आहे. आज दुनियेत विज्ञानात जे जे ज्ञान उपलब्ध आहे किंवा मांडले जातेय, ते सारे आपल्या पूर्वजांना आधीच माहीत होते किंवा ते त्यांनी आधीच शोधलेले होते अशा प्रकारची मांडणी आपण करत आहोत. विमानापासून ते अनेक ग्रहांचा आणि त्यांच्या असण्याचा शोध घेऊ पाहणाऱ्या मानवनिर्मित उपग्रहांच्या वास्तवासंबंधी, हे आपल्याकडे आधीच होऊन गेलेलं आहे, अशी आत्मतुष्टी करणारी मांडणी होत आहे. एक समाज म्हणून दीर्घकाळ ज्या अंधारात आपण जगलो आहोत, त्याच्या वास्तवाकडे आणि त्याच्या कारणांकडे ही मांडणी सोयीस्कर दुर्लक्ष करते. ती आपल्याला एक समाज म्हणून पुन्हा अंधाराकडे नेणारी आहे. दुनिया कशी बदलत आहे आणि ती कोणत्याही दिशेने चालली आहे, याचा विचार आपण करत नाही. ती गोष्ट आपल्याला तितकी तातडीची वाटत नाही.

दुनिया फार वेगाने बदलत आहे. मानवी कुतूहलाचा बौद्धिक प्रवास असाधारण कल्याणकारी दिशेने जात आहे. अगदी अलीकडे माझ्या वाचनात आले आहे की, फिनलंडमधल्या एका विद्यापीठातील संशोधकांच्या एका गटाने कार्बन आणि वीज यांचा वापर करून प्रथिने निर्माण करण्यात यश मिळविले आहे. अन्न निर्मितीच्या दृष्टीने ही क्रांतिकारी घटना आहे. हवेतील हायड्रोजनचा इंधन म्हणून वापर करून वाहने चालवायची आणि बायप्रॉडक्ट हे शुद्ध पेयजल असेल अशा संशोधनाच्या गोष्टी अंतिम टप्प्यात आलेल्या आहेत. मानवी प्रजातीला सुखाने जगता येईल अशा कितीतरी गोष्टी जगभर चाललेल्या आधुनिक संशोधनात स्पष्ट होत आहेत. आपल्याला उपलब्ध असलेले किंवा होऊ

शकणारे अन्न, पाणी आणि हवा आपणास उत्तम आणि मुबलक मिळेल अशा दिशेने हे संशोधनाचे काम चाललेले आहे. आणि याच वेळी या पृथ्वीतलावरील एक प्रजाती म्हणून एकमेकांना किंवा आपल्या सगळ्यांना संपविण्याच्या गोष्टी आपण करत आहोत. अफगाणिस्तान, सिरिया, युक्रेनमधला क्रीमिया, इराण आणि सौदी अरेबिया, उत्तर कोरिया, चिनी समुद्र अशा कुठेही ठिणगी पडू शकते. ती ठिणगी एक प्रजाती म्हणून आपल्या अस्तित्वाची राखरांगोळी करू शकते. असे म्हणताना या पृथ्वीवरील आपण सारी मनुष्ये एक प्रजाती आहोत असे मी गृहीत धरलेले आहे. या प्रकारचे गृहीतक आता धोक्यात आलेले आहे. काही लोक आणि काही देश आपले नागरिक वगळता इतर लोक, म्हणजे बाकीचे सगळे Lesser human beings आहेत, अशा अघोषित धारणा मनाशी बाळगत जगत आहेत. ह्या सगळ्यात कधी काय होईल आणि मानवी प्रजातीचे भविष्य काय असेल, हे सांगणे मुश्कील; जवळपास अशक्यच झालेले आहे.

जगाच्या व्यवहारात, त्या पटलावर कसे वागायचे आणि काय करायचे, हे ठरविताना एक बहुभाषिक आणि बहुसांस्कृतिक भौगोलिक वास्तव म्हणून आपल्या देशबांधवात जो भ्रातृभाव आहे, त्याचे पुनःजागरण करण्याची फार आवश्यकता आहे. एकमेकांना सहन करण्याची, सहिष्णू असण्याची, आपल्याला दीर्घ परंपरा आहे. अमेरिका जशी अमेरिकन लोकांची, ब्रिटन हे ब्रिटिशांचे तसा हिंदुस्थान हिंदूंचा असे म्हणणे या देशात राहणाऱ्या इतर धर्म, पंथ आणि श्रद्धा बाळगणाऱ्या नागरिकांचा अपमान करणारे आहे. असे म्हणणारे त्यांना सोयीचे म्हणून या देशाला हिंदुस्थान म्हणतात. ते भारत हा भारतीयांचा असे नाही म्हणत. भारताला हिंदुस्थान म्हणण्याला माझा आक्षेप नाही. पण भारतात फक्त हिंदू लोक राहत नाहीत. मुसलमान, ख्रिस्ती, बौद्ध, शीख, जैन अशा अनेक धार्मिक श्रद्धा बाळगणारे लोक या देशाचे नागरिक आहेत आणि हिंदू म्हणून आपण कुठे एकसंध आहोत? प्रचंड मोठ्या संख्येने आपल्यात असलेल्या विविध दलित जातींना आपण आपल्या अंतःकरणापासून आपल्या बरोबरीचे कुठे मानत आहोत? की ते फक्त आपली टक्केवारी वाढविण्यासाठी हिंदू? अनेक जाती, अनेक प्रथा, अनेक भाषा अशा कितीतरी वेगवेगळी ओळख सांगणाऱ्या गोष्टी आपल्यात आहेत. त्या सगळ्या आपल्याला अभिमान वाटावा अशा आहेत असे म्हणता येणार नाही. जगात सारीकडे असेच असते. अमेरिका अमेरिकनांची म्हणताना अमेरिकन असे कोणते एकक तिथे आहे? काळे, गोरे, हिस्पॅनिक्स, रेड इंडियन असे तिथेही आहेत. खेरीज जगभरातून तिथे रहिवासाला गेलेले भारतीय, चिनी, फिलिपिनो असे सगळे आहेतच. त्या सगळ्यांच्या श्रमातूनच आजच्या बलाढ्य अमेरिकेची निर्मिती झालेली आहे. आधुनिक काळात अमेरिकेत जे झाले, ते या आपल्या देशात हजारो वर्षांपासून सुरू आहे. जगातल्या यच्चयावत वंशांची उपस्थिती आपल्या लोकांत आहे. ती आपल्याला अभिमान वाटावा अशीच गोष्ट आहे. ते आपल्या सहिष्णुतेचे एक सुंदर दृश्यरूप आहे. या देशात राहणारे ख्रिस्ती, मुसलमान आणि इतर धर्मश्रद्धा बाळगणारे लोक आपल्याइतकेच- म्हणजे स्वतःला हिंदू म्हणविणाऱ्या लोकांइतकेच- भारतीय आहेत. कोणालाही बाहेरचे आणि परके म्हणण्याचा आपल्याला काडीचाही अधिकार नाही. तसा विचार करायचा झाला तर या भारतीय उपखंडातील आपण अधिकांश लोक हे बाहेरचेच लोक आहोत. इथल्या आदिवासी, कोळी, भोई आणि तत्सम लोकांवर आक्रमणे करून आपल्या बहुतेकांच्या पूर्वजांनी इथे जागा करून घेतलेली आहे. कोणी कितीही संख्येने आले तरी त्या सगळ्यांना जगण्यासाठी भरपूर अन्न, पाणी आणि हिमालयाच्या प्राचीन बर्फावरून शुद्ध होऊन आलेली उत्तम हवा या देशात अतिप्राचीन काळापासून मुबलक राहिलेली आहे. मानवी प्रजातीच्या वाढीसाठी आणि



**विमानापासून ते अनेक ग्रहांचा आणि त्यांच्या असण्याचा शोध घेऊ पाहणाऱ्या मानवनिर्मित उपग्रहांच्या वास्तवासंबंधी, हे आपल्याकडे आधीच होऊन गेलेलं आहे, अशी आत्मतुष्टी करणारी मांडणी होत आहे. एक समाज म्हणून दीर्घकाळ ज्या अंधारात आपण जगलो आहोत, त्याच्या वास्तवाकडे आणि त्याच्या कारणांकडे ही मांडणी सोयीस्कर दुर्लक्ष करते. ती आपल्याला एक समाज म्हणून पुन्हा अंधाराकडे नेणारी आहे. दुनिया कशी बदलत आहे आणि ती कोणत्याही दिशेने चालली आहे, याचा विचार आपण करत नाही. ती गोष्ट आपल्याला तितकी तातडीची वाटत नाही.**



अनुक्रमणिका

उत्कर्षासाठी इतकी सहज उत्तम भूमी दुनियेत आणखी कुठेही नाही. साहजिकच अगदी प्राचीन काळापासून सगळ्या दिशांनी माणसांच्या टोळ्या इथे येऊन राहिलेल्या, रहिवसलेल्या आहेत. इथल्या भूमीने आणि इथे आधी आलेल्या लोकांनी विशेष खळखळ न करता नंतर आलेल्यांना सामावून घेतलेले आहे.

पण आज स्वातंत्र्य मिळून सत्तर वर्षे लोटल्यानंतरही आणि बाबासाहेब आंबेडकर यांच्यासारखा महापुरुष इथे होऊन गेल्यानंतरही आपण सर्व जातिधर्मांमधल्या दलितांना आपल्यात पुरेसे सामावून घेतलेले नाहीये. आपल्यासाठी अन्न निर्माण करून आपल्याला जगविणाऱ्या शेतकऱ्यांच्या जगण्यातली परवड वाढती आहे. त्यांच्या आत्महत्येचे प्रमाण वाढते आहे. देश महासत्ता होण्याच्या वल्गना करणाऱ्यांना अन्नाविना उपाशी मरणारे लक्षावधी लोक दिसत नाहीत. ते लोक कसलाही आवाज न करता निमूटपणे नाहीसे होतात. लक्षावधी लहान बालकांना दुनियेतला उजेड दिसतो न दिसतो, तो इथून नाहीसे व्हावे लागते. लक्षावधी स्त्री-भ्रूणांना तर तो उजेड पाहण्याची संधी सुद्धा मिळत नाही. बाबरी मशिदीचे पतन ही आपल्या लोकांच्या धार्मिक सौहार्दावर घाला घालणारी फार दुःखद घटना आहे. तो आपल्यातल्या गंगाजमनी वृत्तीवर झालेला फार मोठा आघात आहे. मतपेटीच्या राजकारणासाठी काही लोकांनी ते केले. त्यांनी त्या वेळी या आघाताचा विचार कसा केला नाही? आणि त्या वेळी सत्तेत असलेल्या लोकांचीही झाले त्याला मूक संमती होती की काय? धार्मिक कारण घेऊन आपल्यापासून अलग झालेल्या शेजारी देशातील राज्यकर्त्यांना तर ते फारच सोयीचे झाले आहे. आम्ही सांगतोय ना, की हे हिंदू लोक मुसलमानांवर किती अत्याचार करतात, त्यांच्या भावना पायदळी तुडवतात. हा बघा त्याचा पुरावा, असे म्हणण्यासाठी त्यांना आपण जागा करून दिलेली आहे. इतके सगळे होऊनही आपले आजचे वर्तमान तितके विस्कटलेले नाहीये. याचे कारण आपल्यातल्या गंगाजमनी वृत्तीचे दीर्घ संचित. परवा कोणत्या तरी एका चॅनलवर एक चर्चा चालू होती. ते असतंच सतत. मी कधीमधी बातम्या पाहण्याची करमणूक म्हणून टीव्ही बघतो. तिथेही प्रचंड पाणी टाकून सगळे दाखवत असतात. तरीही थोडा वेळा का होईना बघण्यासारखं तेच असतं. तर तिथे चर्चा चालू होती, अयोध्येत राममंदिर बांधण्याची. एक मुसलमान म्हणाला, मी बांधीन राममंदिर. मुसलमान असलो तरीही मी कुछवाहा राजपूत आहे. मी प्रभू रामचंद्रांचा वंशज आहे.' आता, या आपल्या एकमेकांत दीर्घकाळ सरमिसळ झालेल्या देशात कोण कोणाचा वंशज आहे, हे सांगणे मुश्कील. प्रभू रामचंद्र कुछवाहा राजपूत होता का, हाही प्रश्नच आहे. काही लोकांच्या मते तो मुंडा जातीच्या लोकांत जन्मला होता, पण त्या मुसलमान माणसाची स्वतःला रामचंद्राशी जोडण्याची वृत्ती मला महत्त्वाची वाटते. हे आपले गंगाजमनी संचित. राम असो वा कृष्ण, मुंडा असो वा गवळी - आपण त्यांना देवांच्या जागी नेले आहे. आणि आपल्या देशातील सगळ्या धर्मांच्या लोकांनी ते केले आहे. आपण यातून बळ घेतले पाहिजे. काळ कठीण आहे. सौदी अरेबियातून आलेल्या पैशाने आपल्या मुसलमानांना भडकावून वेगळे राहण्यास प्रवृत्त केले आहे. त्याचा सामना हे आपले संचित करत आहे. त्याला आपण उचलून धरले पाहिजे. मी आपल्याला आणखी एक अनुभव सांगतो. अली मुल्लाखान वकील नावाचे माझे एक मित्र आहेत. ते माझे संगमनेर महाविद्यालयातील सहकारी. इतिहास, राजकारण, प्रशासन आणि संस्कृती यांचे एक महत्त्वाचे अभ्यासक. हल्ली ते नाशिक जिल्ह्यात चांदवड येथे राहतात. काही काळापूर्वी त्यांचे कराचीला राहणारे काही नातेवाईक महिन्याभरासाठी तिकडे आले होते. इथले वातावरण बघून ते त्यांना म्हणाले, आम्हाला तर खूपच वेगळ्या गोष्टी सांगण्यात आलेल्या होत्या. इथे मुसलमानांवर फार जुलूम होतोय. त्यांचे जिणे इथे हराम झाले आहे, अशा गोष्टी आम्हाला सांगण्यात आलेल्या होत्या. पण इथे तर 'आप लोग कितने चैन और सुकूनसे जी रहे हो. हमारे यहां बिलकूल अलग किस्मका माहौल है. हमारी जिंदगी किडेमकोडेके माफिक हो गयी है. यहां तो औरते भी-चाहे वो हिंदू हो या मुस्लीम- आरामसे कहीभी स्कूटरपर घूम सकती है.'

कोणत्याही क्षणी महायुद्धाचा, आण्विक युद्धाचा भडका उडेल अशी जगातली परिस्थिती आहे. या वर्तमानात आपले एक बहुसांस्कृतिक वास्तव म्हणून एक असणे, एकमेकांचा आदर करणे फार महत्त्वाचे आणि गरजेचे आहे.

या सगळ्यात मी मराठी साहित्य, आजचे साहित्य, महत्त्वाचे लेखन यांच्याविषयी काहीही बोललेलो नाहीये. त्याच्याविषयी बोलणे शक्य आणि आवश्यकसुद्धा आहे. पण इथे मी निर्देशित केलेले प्रश्न आणि त्यांच्यासारखे अनेक प्रश्न हे एक समाज म्हणून आपल्यासाठी खूप जिव्हाळ्याचे, अधिक महत्त्वाचे आहेत, हे आपण मान्य कराल. मी आधी म्हणालो तसे साहित्याचे सारे प्रश्न भाषा आणि संस्कृती यांच्याशी, त्यांच्या वर्तमानाशी संबंधित असतात. ते आपल्या वर्तमान जगण्याशी संबंधित असतात. एक भाषिक समाज म्हणून

आपल्या भाषेच्या वर्तमानाविषयी, प्रश्नांविषयी मी इतरत्र भरपूर बोललेलो आहे. या देशाचा नागरिक म्हणून आज जे मला जिव्हाळ्याचे आणि तातडीचे वाटते, ते मी आपल्यासमोर मांडले आहे. जग प्रत्यही बदलत आहे. फार वेगाने हे बदल होत आहेत. कल्याणकारी दिशेवर एक प्रजाती म्हणून आपण माणसे ठाम राहिलो, तर आपले भवितव्य फार उज्ज्वल आहे. पण त्याला छेद देण्याची, आत्मनाशाची प्रवृत्तीसुद्धा आपल्यात कमी प्रबळ नाहीये. एक प्राचीन आणि सहिष्णू संस्कृती म्हणून या दुनियेला आत्मनाशापासून वाचविण्याची जबाबदारी आपण पत्करली पाहिजे. आपल्या प्रदीर्घ सांस्कृतिक संचिताने ती आपल्यावर टाकलेली आहे, असे आपण मानले पाहिजे. त्यासाठी आपल्यातल्या विविध धर्म, पंथ, जाती या सगळ्यांनी एकमेकांविषयी सौहार्द, भ्रातृभाव बाळगणे गरजेचे आहे. आपल्या नगर जिल्ह्यात श्रीगोंदा येथे शेख महंमद नावाचे श्रेष्ठ संत होऊन गेले. त्यांनी एका अभंगात म्हटले आहे. 'शेख महंमद अविंध, ह्रदयी त्याच्या गोविंद.' आपण नामदेव, ज्ञानेश्वर, चोखामेळा, कबीर, तुकाराम, गालीब, नरसी मेहता आणि शेख महंमद यांचे, यांच्यासारख्या विशालह्रदयी माणसांचे वंशज आहोत. आपली सांस्कृतिक जनुके आपल्याला त्यांच्यातून मिळालेली आहेत. प्राचीन सातवाहन राजवंशापासून ते छत्रपती शिवाजी राजापर्यंत हे भरतखंड बांधलेले ठेवण्याची शिकवण आपल्या महाराष्ट्री लोकांत पाझरलेली आहे. तिचा अंगीकार करून आपण साऱ्या मानवी प्रजातीला आत्मनाशापासून वाचविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. साने गुरुजी म्हणाले होते, 'बलसागर भारत होवो, विश्वात शोभूनी राहो.' बलसागर झाल्याच्या भ्रमात विश्वाला धमकावण्याच्या गोष्टी अनेक महाशक्ती आज करू लागलेल्या आहेत. त्यात गुरुजींचे हे 'विश्वात शोभूनी' राहण्याचे स्वप्न वेगळे आहे. ते संत ज्ञानेश्वरांच्या पसायदानातील 'विश्व स्वधर्म सूर्ये पाहो, जो जे वांछील तो ते लाहो, प्राणिजात,' या ओळींचा वारसा सांगणारे आहे. या प्राचीन भाषा आणि संस्कृतीचे सभासद, या भरतखंडाचे विश्वस्त म्हणून ही जबाबदारी आपल्या पूर्वजांनी स्वीकारलेली होती. तिचे भान ठेवण्याची- त्याचे तातडीने पुनःजागरण करण्याची- आज गरज आहे. असा काही संकल्प या निमित्ताने आपण करू शकलो तर ते एक मोठेच काम होईल, याविषयी माझ्या मनात यत्किंचितही शंका नाही.

आजच्या या अशा वर्तमानात लेखकांनी काय करावे असे मी काहीही म्हणालेलो नाहीये. कारण लेखकांना कोणी आदेश द्यावा आणि त्यांनी तो तंतोतंत पाळावा अशा मताचा मी नाहीये. आपल्या वर्तमानाला प्रतिक्रिया देण्याची प्रत्येक लेखकाची रीत वेगळी असते. त्यांच्या त्या विविध रीतींचा मी आदर करतो. त्यांच्या व्यक्त होण्याच्या स्वातंत्र्याचा मी आदर करतो. त्यांनी त्यांचे ते स्वातंत्र्य जपावे, त्यासाठी पडेल त्या त्यागाची तयारी ठेवावी, हे मात्र मी अवश्य म्हणेन. आजच्या आदेश देणाऱ्या, भय निर्माण करणाऱ्या या काळात आपल्या अभिव्यक्तीचे स्वातंत्र्य टिकविणे, आपला स्वर, आपले नीतिधैर्य टिकवून प्रकट करणे फार महत्त्वाचे झालेले आहे. आणि हे मी फक्त आपल्या भाषेतील किंवा आपल्या देशातील लेखकांसंबंधी म्हणत नाहीये. दुनियेतल्या प्रमुख देशात सारीकडे एकाच वेळी या प्रकारचे भय उत्पन्न करणाऱ्या प्रवृत्ती सत्तेत आलेल्या असण्याचा हा असाधारण काळ आहे. लेखकांच्या नीतिधैर्याची कसोटी पाहणारा हा काळ आहे. आपले आंतरिक स्वातंत्र्य प्राणपणाने जपण्याचा काळ आहे. ते ते किती आणि कसे जपतात, यावर येणाऱ्या दुनियेचे भवितव्य अवलंबून आहे. असे स्वातंत्र्य जपणे हे अनेक प्रकारची जोखीम पत्करतच शक्य असते. ते पत्करण्याचे बळ आपल्या भाषेतल्या आणि दुनियेतल्या सगळ्या भाषांमधल्या लेखकांना या ना त्या प्रकारे प्राप्त होवो, अशी शुभेच्छा व्यक्त करून मी थांबतो. धन्यवाद. ■

**रंगनाथ पठारे**
संमेलनाध्यक्ष,
विभागीय साहित्य संमेलन,
म.सा.प., शाखा सावेडी, अहमदनगर
३१ ऑक्टोबर २०१७

---



## हार्दिक अभिनंदन!

'१९व्या राष्ट्रीय बंधुता साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्यवाह आणि ज्येष्ठ कवी उद्धव कानडे यांची निवड झाल्याबद्दल त्यांचे हार्दिक अभिनंदन!







भाषण

**हरिश्चंद्र थोरात**

# समीक्षेसमोरील आव्हाने



**महाराष्ट्र साहित्य परिषद, शाहुपुरी शाखा, सातारा आणि छत्रपती शिवाजी कॉलेज, सातारा यांच्या विद्यमाने सातारा येथे दि. २९ आणि ३० नोव्हेंबर २०१७ रोजी झालेल्या 'समीक्षा : सिद्धान्त आणि व्यवहार' या चर्चासत्रात सादर झालेला बीजनिबंध...**





'समीक्षा : सिद्धान्त आणि व्यवहार' किंवा 'समीक्षेसमोरील आव्हाने' यांसारख्या विषयांवर चर्चा करताना आपल्याला साहित्यसमीक्षा प्रामुख्याने अभिप्रेत आहे. साहित्याभ्यास या व्यापक संकल्पनेमध्ये कोणकोणत्या शाखांचा समावेश होतो, त्यांच्यात कोणते परस्परसंबंध असतात, त्यांची योग्यायोग्यता ठरवता येईल काय, समीक्षा म्हणजे नेमके काय, समीक्षा या संकल्पनेची विविध अंगे कोणकोणती आहेत, असे अनेक प्रश्न समीक्षेच्या संदर्भात विचारता येतात. या प्रश्नांची उत्तरे देताना केला जाणारा विचार हा प्रामुख्याने साहित्याभ्यासाचे व्यवस्थापन कसे व्हावे, याविषयीचा विचार आहे. अनेक महत्त्वाच्या समीक्षकांनी तो तपशिलात जात केला आहे. या चर्चासत्रामध्येही या विषयाचा परामर्श घेतला जाणार आहे. येथे इंग्रजीच्या संदर्भाने रेने वेलेक व मराठीच्या संदर्भात रा. भा. पाटणकर यांची नावे आर्वजून आठवतात. हा विचार महत्त्वाचा आहे यात शंकाच नाही, तथापि, प्रस्तुत निबंधात त्यावर विशेष भर दिला जाणार नाही.

आपल्या आजच्या विचारविश्वामध्ये समीक्षा ही संकल्पना व्यापक अर्थाने वापरत तिच्यामध्ये साहित्याभ्यासाच्या सर्व शाखांचा समावेश आपण करतो आहोत, असा माझा समज झाला आहे. त्यामुळे समीक्षेसमोरील आव्हानांचा विचार करताना सैद्धान्तिक समीक्षा, साहित्येतिहास, प्रत्यक्ष समीक्षा ही साहित्याभ्यासाची सर्वच अंगे आपल्याला अभिप्रेत आहेत. उपरोक्त विषयांबद्दलचा ऊहापोह गृहीत धरून पण समीक्षेचा भोवतालचा व्यवहार नजरेसमोर ठेवत त्याची मीमांसा करणे येथे अभिप्रेत आहे. समीक्षेचे स्वरूप आणि तिच्यातील क्षेत्रांचे व्यवस्थापन बदलत आलेले आहे, हे लक्षात घेतले की, या बदलाच्या दिशा लक्षात घेऊन







अनुक्रमणिका



समीक्षेचा व्यवहार कोणत्या अवस्थेमध्ये आहे आणि त्याची अर्थपूर्णता कशी वाढवता येईल, याबद्दलचा विचार 'समीक्षेसमोरील आव्हाने' या विषयामध्ये समाविष्ट होणे अपरिहार्य ठरते.

आपला दृष्टिकोन ऐतिहासिक आहे, असे म्हणता येईल. याचा अर्थ असा की, आपण समीक्षेला जडणघडणीच्या प्रक्रियेत असताना पकडणार आहोत. समीक्षाव्यवहाराच्या रूपांतरणाला बोलते करण्याचा प्रयत्न करणार आहोत आणि या रूपांतरणामागच्या कारणांचा शोध घेण्याचा प्रयत्न करणार आहोत. आपल्या चर्चासत्राच्या शीर्षकामध्ये असलेली सिद्धान्त ही संकल्पना म्हणजे सैद्धान्तिक प्रारूपांची गोळाबेरीज नव्हे आणि व्यवहार म्हणजे उपयोजनातून निर्माण होणाऱ्या समस्यांचे आकलन करून घेणे नव्हे. सिद्धान्त या संकल्पनेमधून सैद्धान्तिक विवेचनाच्या मागे जात आपल्याला सैद्धान्तिक पातळीवरील विचार शक्य करणारी सर्वसाधारण आणि अमूर्त पातळीवरील अवस्था किंवा परिस्थिती स्पष्ट करायची आहे, तर व्यवहार या संकल्पनेमधून सैद्धान्तिक मांडणीसह एकूण समीक्षात्मक व्यवहाराचा मूर्त ऐतिहासिक संदर्भ स्पष्ट करायचा आहे. व्यवहाराबद्दल विचार करताना, त्यामुळेच आपल्याला मराठी समीक्षेला आकार देणाऱ्या सामाजिक सांस्कृतिक तथ्यांना स्पर्श करावा लागणार आहे. एकमेकांशी द्वंद्वात्मक संबंधांनी निगडित असलेली ही दोन अंगे एकमेकांचे स्वरूप स्पष्ट करण्यासाठी उपयुक्त ठरतील, अशी अपेक्षा आहे. आपला विषय यामुळे अत्यंत सहजतेने 'मराठी समीक्षेसमोरील आव्हाने' असा होईल आणि समीक्षेच्या संदर्भात उद्भवलेली 'क्रायसिस'ची परिस्थितीही यामधून स्पष्ट करता येईल.

समीक्षेविषयीचा गौणभाव हा मराठी साहित्यक्षेत्राचा एक महत्त्वाचा विशेष आहे आणि तो प्रामुख्याने सर्जनशील लेखनाच्या सापेक्षतेने आहे. या गौणभावाला अर्थातच जुन्या परंपरांचा आधार आहे. सर्जनशील साहित्य अव्वल आणि समीक्षा दुय्यम अशा आविर्भावात समीक्षेविषयी अनेक लोक बोलत असतात. या बाबतीत चित्रविचित्र रूपकांचा आधार विवेचनासाठी घेतला जातो. कोणी 'टीका लिहिणे ही साहित्यव्यवहारावरची ऐतखाऊ क्रिया आहे' असे सांगून बांडगुळाची आठवण काढते (नेमाडे, १९९०); तर कोणाला टीकाकाराची भूमिका स्पष्ट करताना अपत्याचे मन समजावून घेणाऱ्या मातेची किंवा रमणीचे विभ्रम आणि हट्ट समजावून घेणाऱ्या वल्लभाची आठवण येते. (क्षीरसागर, १९७२, पृ. १०२). सौंदर्यरूपाचा दरवाजा खुला आहे हे जाणवल्यानंतर कोणी समीक्षकाला चपला बाहेर काढून, वाकून आत जाण्याची सूचना करतो (आचवल, १९७२, पृ. १४४); तर कोणी कवीला 'अग्रक्रम' देऊन समीक्षकाने त्याच्याशी तन्मय व्हावे, त्याच्याविषयी सहानुभूती बाळगावी आणि त्याच्याशी हृदयसंवाद साधावा असा सल्ला देताना दिसतात (जोग, १९७२, पृ. १२६-२९). संहिता आणि वाचक-समीक्षक यांच्यातील गुंतागुंतीच्या संबंधांची अजूनही आपल्याला कल्पना आलेली नाही. हृदयसंवादापेक्षा अर्थनिर्णयन, तन्मयतेऐवजी चिकित्सा, सहानुभूतीऐवजी संबंधांमधील राजकारणाचे आकलन अशा गोष्टी आल्या, तर सर्जनशील लेखन आणि पामर टीकाकार हे समपातळीवर येऊ शकतात, याची विशेष जाणीव आपल्या समीक्षाविषयक संभाषितात दिसत नाही.

समीक्षेविषयीचा हा गौणभाव लेखकाविषयीच्या पराकोटीच्या आदरभावातून आला आहे. बऱ्याच वर्षांपूर्वी 'लेखकाचे स्वातंत्र्य आणि समाज' या निबंधामध्ये आपल्याकडील लेखकाची लोकप्रिय आणि लेखकप्रिय संकल्पना मी स्पष्ट केली होती. लेखकाचे प्रतिभावंत असणे, सर्वसामान्यांपेक्षा वेगळे असणे, अधिक शहाणे असणे, त्याच्यामध्ये एक आंतरिक गुणचैतन्य असणे, सर्जनशीलता असणे, द्रष्टेपणा असणे वगैरे गुण अधोरेखित करून रोमँटिक दृष्टिकोन आणि आधुनिक व्यक्तिवाद या पाश्चात्त्य गोष्टींमध्ये प्राचीन भारतीय साहित्यशास्त्रातील काही रंग मिसळून हे चित्र निर्माण करण्यात आले आहे, असा निष्कर्ष काढला होता (थोरात, २००५, पृ. ४-५). लेखकाचा हा वजनदारपणा अजूनही टिकून आहे आणि मराठी समीक्षकाचे वजन दिवसेंदिवस घटत चालले आहे. सुरुवातीपासूनच साहित्याविषयीचे विवेचन लेखकमुखाने करण्याची पद्धती असल्यामुळे वाचक-समीक्षकाच्या भूमिकेचा गंभीरपणे विचारच झालेला नाही. त्यामुळे अत्यंत सहजतेने समीक्षेचा दुबळेपणा स्पष्ट करताना सर्जनशील साहित्याच्या योग्यतेविषयीचे मूलभूत प्रश्न मात्र उपस्थित केले जात नाहीत. वाचक आणि समीक्षकाचा लेखकाच्या सर्जनशील प्रक्रियेमध्ये असलेला सहभाग, वाचक-समीक्षकाच्या अर्थनिर्णयनामधील गांभीर्य, त्याच्या चिकित्सकतेमधून उलगडणारे नवे संदर्भ या गोष्टी अलीकडच्या काळात पाश्चात्त्य समीक्षेमध्ये प्रभावी ठरू लागल्या आहेत. सर्जनशील कलावंत आणि काथ्याकूट करणारा समीक्षक यांच्यामधील अंतर त्यामुळे बरेच कमी झाले आहे. लेखक या पदावर केवळ सर्जनशील लेखकच नव्हे, तर समीक्षकही हक्क सांगू

लागला आहे. समीक्षेचे अपारंपरिक रूपबंध अस्तित्वात येऊ लागले आहेत. मराठीमध्ये मात्र समीक्षेविषयीचा हा आत्मविश्वास अजूनही निर्माण झाला नाही. ती अजूनही देवतास्वरूप लेखकासमोर नम्र होऊन आपला गौणभाव टिकवून आहे. ही परिस्थिती बदलता येते याचे भान निर्माण होणे, ही समीक्षेची गरज आहे.

१९६०पर्यंतची आधुनिक पाश्चात्य समीक्षा आणि १९७५ नंतरचे काही अपवाद वगळता अगदी आजवरची मराठी समीक्षा पाहिली, तर एकंदरीने समीक्षेचा व्यवहार मोठ्या प्रमाणित अल्पसंतुष्ट होता, असे म्हणता येईल. या व्यवहाराच्या सीमारेषा नीट काटेकोरपणे आखून घेण्याचा प्रयत्न केला जाई. आपली ज्ञानशाखा इतर ज्ञानशाखांपासून सुरक्षित कशी ठेवावी, या विचाराला अग्रक्रम दिला जाई. प्रत्येक ज्ञानक्षेत्राचा अभ्यासविषय, पद्धतिशास्त्र, परिभाषा यांतील भेद काळजीपूर्वक जपले जात. एखाद्या व्यामिश्र घुसळणीऐवजी शिक्षणाच्या क्षेत्रात विद्यार्थ्यांना निवडण्यासाठी योग्य असा विषय असे नेमके आणि सुटसुटीत रूप समीक्षेला दिले जाई. भाषा आणि विशेषतः साहित्याच्या अध्यापनाचा गाभ्याचा भाग या धारणेतूनच समीक्षा या विषयाची बौद्धिक रचना होई. अणि रचना करताना इतर विषय व ज्ञानशाखांची सावली पडू नये याची खबरदारी घेतली जाई. समीक्षेच्या क्षेत्राची जबाबदारी केवळ भाषा विषय शिकवणाऱ्या प्राध्यापकांचीच आहे, असे वातावरण असे.

समीक्षेचे हे शिक्षणकेंद्री स्वरूप मोडून काढणे ही बरीचशी अवघड गोष्ट आहे. कारण समीक्षेमध्ये जाणीवपूर्वक घेतलेल्या प्रशिक्षणाला, जोपासलेल्या बौद्धिकतेला आणि सांकल्पनिक पातळीवरील विवेचनाला महत्त्वाचे स्थान असते. समीक्षा आणि शिक्षणव्यवस्था यांच्यातील संबंध मान्य करूनही समीक्षेचे क्षेत्र अधिक व्यापक करणे शक्य होते. त्यासाठी विविध ज्ञानशाखांना समीक्षेच्या क्षेत्रात प्रवेश देणे गरजेचे होते. मराठी समीक्षेच्या संदर्भात ही गोष्ट जमेल तेवढी टाळण्याचा प्रयत्न आपण केला आहे. १९७५च्या आसपास मुंबई विद्यापीठामध्ये रा. भा. पाटणकर, मे. पु. रेगे इत्यादिकांनी पुढाकार घेऊन विद्यापीठीय पातळीवर मराठी व इंग्रजीच्या विद्यार्थ्यांसाठी सौंदर्यशास्त्राच्या दोन विषयपत्रिका अभ्यासक्रमात आणल्या, तेव्हा हा विषय मराठीच्या अंतर्गत कसा येऊ शकतो, असा अनेकांना प्रश्न पडत असे. ज्ञानशाखेच्या विशुद्धतेविषयीच्या आग्रही कल्पनांपासून दूर राहणे हे समीक्षेसमोरील एक महत्त्वाचे आव्हान आहे, असे



**समीक्षेविषयीचा गौणभाव हा मराठी साहित्यक्षेत्राचा एक महत्त्वाचा विशेष आहे आणि तो प्रामुख्याने सर्जनशील लेखनाच्या सापेक्षतेने आहे. या गौणभावाला अर्थातच जुन्या परंपरांचा आधार आहे. सर्जनशील साहित्य अव्वल आणि समीक्षा दुय्यम अशा आविर्भावात समीक्षेविषयी अनेक लोक बोलत असतात. या बाबतीत चित्रविचित्र रूपकांचा आधार विवेचनासाठी घेतला जातो. कोणी 'टीका लिहिणे ही साहित्यव्यवहारावरची ऐतखाऊ क्रिया आहे' असे सांगून बांडगुळाची आठवण काढते; तर कोणाला टीकाकाराची भूमिका स्पष्ट करताना अपत्याचे मन समजावून घेणाऱ्या मातेची किंवा रमणीचे विभ्रम आणि हट्ट समजावून घेणाऱ्या वल्लभाची आठवण येते.**

आपल्याला म्हणता येईल. उदाहरणार्थ पाहा की, या बाबतीत साहित्यसमीक्षेच्या बंदिस्त सीमारेषांची बंधने अमान्य असणारे समीक्षक विचारवंतही अगदी जपून आणि मोजून मापून बंडखोरी करताना दिसतात. त्यांना समीक्षेच्या 'हस्तिदंती मनोऱ्याबाहेर' पडावेसे वाटते. तथापि, साहित्यसमीक्षक ही आपली ओळख शाबूत ठेवून त्यांना ही गोष्ट करता येत नाही. रा. ग. जाधव यांच्या दृष्टिकोनातून विचार केला तर साहित्यसमीक्षक ही ओळख सोडून अभ्यासकाला एक जागृत विवेकवादी किंवा इंटेलेक्चुअलचे रूप धारण करावे लागते. समाजाच्या व्यापक पार्श्वभूमीवर साहित्यनिर्मितीचा अर्थ व अन्वय लावण्याचा प्रयत्न रा. ग. जाधव यांना मूल्ययुक्त वाटत असला तरी साहित्याचा साहित्य म्हणून अभ्यास करण्याची साहित्यसमीक्षकाची मर्यादा त्याला ओलांडावी लागते, असे त्यांचे प्रतिपादन आहे (जाधव, १९९९, पृ. २६३-६४). याचा अर्थ असा की, समीक्षा म्हणजे साहित्याचा साहित्य म्हणून केलेला विचार हा शोभिवंत पण आतून कुजलेला नारळ टिकवून ठेवला पाहिजे अशीच त्यांची धारणा दिसते.

पाश्चात्य समीक्षेने या संदर्भात महत्त्वाची म्हणता येतील अशी पावले उचलली आहेत. तेथील समीक्षेला अपरिहार्यपणे महाविद्यालये आणि विद्यापीठे यांच्या भाषा व साहित्य

विभागांच्या बाहेर पडावे लागते आहे. याचे एक कारण हे विभागच आता अस्थिर झाले आहेत. साहित्य या संकल्पनेऐवजी संस्कृती या संकल्पनेला महत्त्व देत अधिक व्यापक पायावर संबंधित विभागांची पुनर्रचना होते आहे. संस्कृती या संकल्पनेची उदात्तीकरण केलेली, पारंपरिकतेची गुढी उभारणारी संकल्पना बाजूला सारून सामाजिक परस्परसंबंधांमधील राजकारणाला अग्रक्रम देणारी, मार्क्सच्या कल्पनाप्रणालीशी नाते जोडणारी संस्कृतीची संकल्पना पुढे येते आहे. तिचे विश्लेषण करायचे असेल तर इतिहास, राज्यशास्त्र, समाजशास्त्र, भाषाविज्ञान, चिन्हमीमांसा, तत्त्वज्ञान, मानसशास्त्र आणि साहित्याभ्यास यांसारख्या विविध ज्ञानशाखांनी एकत्र येण्याची गरज भासू लागली आहे. ज्ञानशाखांच्या भिंती कोसळत आहेत. संस्कृती-अभ्यास या संकल्पनेचा शिक्षणक्षेत्रात प्रवेश झाल्यानंतर या विषयाचे विभाग निर्माण झालेले नसले तरी केंद्रे निर्माण झाली. त्याच्या अध्यापनाचे प्रोग्राम निर्माण झाले. भाषा आणि साहित्य यांचे विभाग संस्थात्मक पातळीवर शिल्लक राहिले असले तरी विशेष प्रावीण्याच्या संकल्पना बदलल्या. साहित्यशास्त्राऐवजी साहित्यनिरपेक्ष सिद्धान्तव्यूहाची कल्पना प्रभावी होऊ लागली, असे व्हिन्सेन्ट बी. लिच या अभ्यासकाने एका मुलाखतीत दिलेल्या माहितीच्या आधारे म्हणता येते (लिच, २००३, पृ. ७३-७४). ही अर्थातच नव्वदीमधल्या अमेरिकन शिक्षणव्यवस्थेमधील परिस्थिती आहे.

एकेकाळी साहित्यसमीक्षेविषयीची सर्व ज्ञानसत्ता आपल्या क्षेत्राच्या बाहेर न डोकावणाऱ्या व साहित्याचा अभ्यास करणाऱ्या समीक्षकाच्या हातात असे. दुसऱ्या एखाद्या ज्ञानशाखेची मदत हवी आहे, असे उत्कटपणे वाटले तर त्याला आपल्या क्षेत्राबाहेर पडावे लागे. त्या ज्ञानशाखेत प्रावीण्य मिळवून पुन्हा आपल्या साहित्याभ्यासाच्या क्षेत्रात तो प्रवेश करी. मराठी समीक्षेच्या संदर्भातील याचे उत्तम उदाहरण म्हणजे रा. भा. पाटणकर होत. आपल्या सौंदर्यशास्त्रीय प्रकल्पासाठी त्यांनी तत्त्वज्ञानाचा कसून अभ्यास केला आणि मग ते पुन्हा आपल्या मूळ क्षेत्राकडे परतले. या उदाहरणात साहित्यसमीक्षक केंद्रस्थानी आहे आणि त्याला गरज वाटली म्हणून तो बाहेरची मदत घेत आहे. कुठे तरी कोपऱ्यात एकाकी बसून व्यासंग करणाऱ्या एका विद्वानाचे प्रारूप इथे प्रभावी आहे. आज बाहेरच्या हस्तक्षेपाचे प्रमाण वाढले आहे. साहित्यसमीक्षक केंद्रस्थानी राहिलेला नाही. त्याची इच्छा असो वा नसो, इतर ज्ञानशाखा साहित्याभ्यासाच्या कक्षेत प्रवेश करत आहेत. अनेक अभ्यासकांनी एकत्र येऊन केलेला संवाद किंवा पार पाडलेला प्रकल्प हे साहित्यसमीक्षेचे रूप आज ना उद्या रूढ होण्याच्या शक्यता निर्माण होत आहेत. ज्ञानक्षेत्रांच्या संबंधांमुळे निर्माण झालेल्या या परिस्थितीमधून समीक्षाविषयक जाणिवेला वाट काढावी लागणार आहे.

सैद्धान्तिक समीक्षा, साहित्येतिहास आणि प्रत्यक्ष समीक्षा अशा तीन ज्ञानशाखांनी मिळून साहित्याभ्यासाच्या क्षेत्राची समग्रता निर्माण होते, असे विवेचन आधुनिक समीक्षेमध्ये अनेक अभ्यासकांनी केले आहे. याबद्दलचा नीटनेटका विचार आपल्याला अर्थातच रेने वेलेकच्या लेखनामध्ये सापडतो. 'थिअरी अव लिटरेचर' या ग्रंथामध्ये या तीन ज्ञानशाखांमधील भेद स्पष्ट करून हा भेद सर्वांना स्वीकारार्ह वाटेल असाच आहे आणि या तीन ज्ञानशाखांमधला संवाद साहित्याभ्यासाच्या दृष्टिकोनातून उपकारक ठरेल अशी आशावादी व काहीशी भाबडी भूमिका त्याने घेतली आहे. 'कन्सेप्ट्स अव क्रिटिसिझम'मध्ये आपला भाबडेपणा त्याच्या लक्षात आला आहे आणि या तिन्ही ज्ञानशाखांमधील संघर्षाचे संबंध त्याच्या लक्षात येऊ लागले आहेत (वेलेक, १९६३, पृ. ०१-०२). कधी सैद्धान्तिक समीक्षा आणि प्रत्यक्ष समीक्षा यांना पदच्युत करून साहित्येतिहास सर्वंकष सामर्थ्याची द्वाही फिरवतो आहे, तर कधी साहित्येतिहासाच्या कालक्रमिकतेला अर्थशून्य ठरवत सर्वसाधारण पातळीवर जाऊ पाहणारी सैद्धान्तिक समीक्षा सत्ताधारी होऊ पाहते आहे, तर कधी विवक्षित साहित्यकृतीला काळाच्या आणि संकल्पनांच्या जाचातून मुक्त करीत प्रत्यक्ष समीक्षा आपल्या व्यवहाराच्या अर्थपूर्णतेची द्वाही पुकारते आहे. वर सांगितलेल्या तीन ज्ञानशाखांमधील संघर्षामधून वाट काढणे ही अवघड गोष्ट आहे, याची जाणीव नंतरच्या काळातील वेलेकला झाली आहे.

मराठीमध्येही विवक्षित साहित्यकृतीची समीक्षा, साहित्याच्या स्वरूपाचा परामर्श घेणारे साहित्यशास्त्रीय सिद्धान्तव्यूह आणि साहित्यकृतीच्या समीक्षेत वापरल्या जाणाऱ्या संकल्पनांचे स्वरूप आणि परस्परसंबंध स्पष्ट करणारे सौंदर्यशास्त्र यांचे परस्परांशी असलेले सौहार्दाचे संबंध साहित्यसंस्कृतीच्या जोपासनेसाठी हितकारक ठरतील असे विवेचन झाले आहे. यांतील प्रत्येकाचे कार्य सुस्पष्टपणे वेगळे करीत रा. भा. पाटणकरांनी त्यांची श्रेणीयुक्तताही स्पष्ट केली आहे. ते म्हणतात, 'साहित्यशास्त्रज्ञ आपल्या क्षेत्रात राजा असतो. त्याने लोकानुवर्ती बनून निर्धास्त राज्य करावे. तो

सौंदर्यशास्त्रज्ञ नामक सम्राटाचा मांडलिक नव्हे. सौंदर्यशास्त्रज्ञ हा केवळ सल्लागार. राज्यात जर गुंतागुंतीचे प्रश्न निर्माण झाले, तर ते सोडविण्याच्या कामी मदत करणे हे त्याचे काम'. (पाटणकर, २००१, पृ. ८१) साहित्यशास्त्रज्ञाचे 'राजा' असे वर्णन करताना पाटणकरांनी राजाने लोकानुवर्ती बनावे अशी अपेक्षा व्यक्त केली आहे. त्याच्या लोकानुवर्ती असण्यामधून पाटणकरांना काय अभिप्रेत असावे? त्यांना बहुधा समीक्षकांनी केलेली प्रत्यक्ष समीक्षेची, साहित्यकृतीच्या विश्लेषणाची, मूल्यमापनाची उदाहरणे अभिप्रेत असावी असे म्हणता येते. इतरत्र त्यांनी 'समीक्षाव्यवहारापुरते बोलायचे तर आपल्याला विशिष्ट वाङ्मयकृतींच्या समीक्षेच्या पातळीवरून सैद्धान्तिकतेच्या, सौंदर्यमीमांसेच्या पायरीवर जायला हवे.' (पाटणकर, १९८४, पृ. अठरा) अशी अपेक्षा व्यक्त केली आहे. थोडक्यात, पाटणकरांनी तीन पायऱ्यांचा क्रमवद्ध सोपान रचला आहे आणि प्रत्यक्ष समीक्षा, साहित्यशास्त्र आणि सौंदर्यशास्त्र यांचे परस्परपूरक असे व्यवस्थापन सुचवले आहे. पाटणकरांच्या या सोपानामध्ये साहित्येतिहासाची पायरी नाही, ही गोष्ट लक्षात घेण्यासारखी आहे आणि त्याचबरोबर हे नीटनेटके क्रमबद्ध व्यवस्थापन विस्कटण्याची किंचितशीही भीती त्यांच्या मांडणीमध्ये नाही.

तथापि, अगोदरच्या पारंपरिक मंडळींना अभिप्रेत असलेली नीटनेटकी घडी विस्कटली आहे आणि समीक्षाव्यवहाराचे काही पैलू अधिक गुंतागुंतीचे होत चालले आहे, असे निदर्शनास येते आहे. प्रत्यक्ष समीक्षा, सैद्धान्तिक समीक्षा यांच्यातील परस्परांवर अवलंबून असणे संपुष्टात आले आहे. त्यांच्याकडे साहित्याभ्यासाची आणि संस्कृतीच्या अभ्यासाची साधने म्हणून पाहिले जाण्याऐवजी त्यांच्याकडे साध्य म्हणून पाहिले जाऊ लागले आहे. 'पूर्वी समीक्षेचा इतिहास हा साहित्येतिहासाचा भाग असे, पण आता साहित्याचा इतिहास हा समीक्षेचा इतिहास झालेला आहे' या अर्थाचे जोनाथन कलरचे अवतरण 'द नॉटान एन्थॉलॉजी अव थिअरी एन्ड क्रिटिसिझम' या ग्रंथाच्या दुसऱ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत संपादकांना वापरावेसे वाटले, यातून बरेच काही सांगितले जाते आहे (लिच, २०१०, पृ. १). सिद्धान्तव्यूह स्वायत्त होत चालला आहे आणि त्याचा साहित्यकृतीकडे असलेला रोख बदलून सिद्धान्तव्यूहासाठी सिद्धान्तव्यूह या अवस्थेपर्यंत तो जाऊन पोहोचला आहे. विशिष्ट घटितांचे स्पष्टीकरण करण्याच्या उद्देशाने त्याची निर्मिती आता होत नाही. ज्ञानशाखांच्या सीमारेषा त्याने उद्ध्वस्त केल्या आहेत आणि तो अत्यंत सहजतेने विविध ज्ञानक्षेत्रांमध्ये मुक्त हुंदडतो आहे. जिच्यावर समीक्षाव्यवहार रोखलेला असायला हवा, असा आग्रह एके काळी धरला होता, त्या साहित्यकृतीच्या अस्तित्वाविषयीच शंका निर्माण केल्या जात आहेत. तिची संपूर्णता, एकात्मता आणि सुरचितता नाकारली जात आहे. एक तर साहित्याच्या संभापिताला दिलेला खास दर्जा काढून घेतला जात आहे किंवा साहित्यिक समजल्या जाणाऱ्या विशेषांचे अस्तित्व सर्वच संभाषितांमध्ये पाहिले जाते आहे.

हा कालखंड अर्थातच अमेरिकन संस्कृती-अभ्यासांचा व पोस्ट-थिअरीचा कालखंड आहे. सिद्धान्तव्यूह (थिअरी) म्हणजे शास्त्रीयता, तर्कशुद्धता, सुसंगतता, सुव्यवस्थितता या आधुनिकतेने निर्माण केलेल्या कल्पना या कालखंडात बाद झाल्या आहेत. साहित्य प्रथम निर्माण होते आणि नंतर त्याचा अभ्यास करण्याच्या हेतूने सिद्धान्तव्यूह निर्माण होतो, हा क्रमही नाकारला गेला आहे. साहित्यकृतीचे अर्थनिर्णयन करण्यासाठी आवश्यक असलेली धारणासमष्टी हे सिद्धान्तव्यूहाचे स्वरूप नाकारले गेले आहे. विवेकशीलता, बुद्धिप्रामाण्य, तार्किकता, आविष्कारावरचे नियंत्रण या साऱ्याच गोष्टींना नकार दिला गेल्यामुळे खरे तर सिद्धान्तव्यूहाची अस्तित्वात येण्याची शक्यताच नष्ट झाली आहे. १९६०नंतरच्या काळातील आधुनिकोत्तर सिद्धान्तव्यूह हा काहीही स्पष्ट न करू शकणारा नकारात्मक सिद्धान्तव्यूह आहे. अगदी अलीकडच्या काळात आधुनिकोत्तर असण्याची पाश्चात्य पद्धती नाहीशी होऊ लागली आहे, असे म्हटले जाते आहे. तथापि, त्यामुळे त्यापूर्वीची मानवकेंद्री निरागसता पुन्हा प्रस्थापित होते आहे असे म्हणता येणार नाही.

आता हा सगळा प्रकार तिकडे फ्रान्समध्ये किंवा अमेरिकेत होतो आहे आणि त्याचा व आपल्या पवित्र संस्कृतीचा काहीच संबंध नाही, असे म्हणून भागणार नाही. गेली दोनेकशे वर्षे आपल्या साहित्याचा आणि समीक्षेचा पाश्चात्त्य साहित्याशी व समीक्षेशी संबंध राहिला आहे, हे विसरणे अनैतिहासिक ठरेल. पोस्ट थिअरीपासून स्फूर्ती घेणारी समीक्षा मराठीला नवी आहे, असे म्हणता येणार नाही. सतराव्या शतकातील मराठी तुका आणि विसाव्या शतकातील फ्रेंच फुका यांची सांगड घालून आधुनिकतेशी पंगा घेणारी समीक्षा मराठीतही लिहिली जाऊ लागली आहे. मराठी समीक्षेचे संभाषित बदलू लागले आहे. एकीकडे, संदर्भ आणि तळटिपांनी सजलेल्या सुव्यवस्थित आणि विद्वत्तापूर्ण अशा पाटणकरी शैलीऐवजी वाचकांशी अधिक जवळचा संपर्क साधणारी, अनौपचारिक भाषेतली, नाट्यपूर्ण

अपरिक्षित विधाने करणारी, टवाळीच्या पातळीवर उतरणारी शैली मराठी समीक्षेत रूढ होऊ लागली आहे. तर दुसरीकडे समाजशास्त्र, मानसशास्त्र, मानवशास्त्र इत्यादी शास्त्रे समीक्षेच्या दृष्टीने खूप महत्त्वाची आहेत आणि आपल्या समीक्षाव्यवहारामध्ये या शास्त्रांतील मर्मदृष्टींचा समावेश करायला हवा, असे आवर्जून सांगितले जाते आहे. खास आधुनिकोत्तर जाणिवेत बसतील असे अंतर्विरोध मराठी समीक्षेमध्ये अवतरू लागले आहेत.

ही परिस्थिती समीक्षेच्या आणि मराठी समीक्षेच्या बाबतीत आव्हानात्मक आहे, असे आपल्याला म्हणता येईल. नवे जे काही घडते आहे, त्याच्याकडे पूर्णपणे पाठ फिरवून, मराठी समीक्षेला या भलत्यासलत्या आणि दुर्बोध गोष्टींची काहीच गरज नाही असा निवाडा देणारे परंपरावादी मराठीमध्ये आहेत. कुठल्याही प्रकारच्या बौद्धिकतेचा मनापासून राग करत मनःपूत लिहिणारे लोकही आपल्यामध्ये आहेत. जे चालले आहे त्याची मीमांसा करून आणि काय केले पाहिजे, याचा शांतपणे विचार करण्याची प्रक्रिया अजूनही आपल्याकडे चालू झालेली नाही.

उदाहरणार्थ, साहित्यावर दिला जाणारा भर कमी करून साहित्याऐवजी संस्कृती ही संकल्पना केंद्रस्थानी आणणे हितावह आहे असे म्हणायला हरकत नाही. साहित्याच्या ठिकाणी संस्कृती आली की, साहित्याच्या कलात्मकतेचा विचार बाजूला पडेल अशी भीती काहींना वाटते. वर्तमानपत्रातील जाहिरात आणि साहित्यात्म संहिता एकाच मापाने मोजल्या जाऊ लागतील ही कल्पना सौंदर्यासक्त मनांना पटत नाही. तथापि, साहित्याच्या संभाषिताचा वरचा दर्जा आणि त्याची कलात्मकता हे संस्कृतीनेच निर्माण केलेले घटित आहे, ही गोष्ट लक्षात घेतली की, साहित्याचे सौंदर्यात्म विशेष संस्कृती-अभ्यासाचे विषय ठरू शकतात. फक्त त्यासाठी सौंदर्यविधानांचे तार्किक विशेष शोधताना किंवा शोधण्याऐवजी वर्ग, राजकारण, उत्पादनव्यवस्था, कल्पनाप्रणाली, ऐतिहासिकता यांसारख्या संकल्पनांना अग्रक्रम द्यावा लागेल. अभ्यासामध्ये साहित्याच्या ठिकाणी संस्कृती आली की, अनेक लक्षवेधी घटना घडू लागतात. दैनंदिन जगण्याचे अनेक पैलू आपल्या विवेचनामध्ये प्रवेश करू लागतात. त्यांचे बोट धरून, साहित्याभ्यासाला दूर करत अनेक ज्ञानशाखाही आत येतात, हे आपण वर पाहिलेच आहे. महत्त्वाची गोष्ट म्हणजे संस्कृतीचा विचार करताना लेखक आणि वाचक ही जोडगोळी बाजूला फेकली जाते आणि तिच्या ठिकाणी सामाजिक-सांस्कृतिक समग्रतेचे सतत बदलणारे, अनेक रूपे धारण करणारे विश्व येते. संस्कृती-अभ्यासामध्ये मानवी जगण्याच्या समग्रतेला भिडण्याचा प्रयत्न अध्याहृत असल्यामुळे तो अर्थपूर्ण ठरतो. तथापि, ही अर्थपूर्णता तर्काच्या, विवेकाच्या, चिकित्सेच्या, न्यायाच्या कल्पनांच्या संदर्भात अस्तित्वात येणे मूल्ययुक्त ठरते. संस्कृतीचा अभ्यास आधुनिकोत्तर शून्यवादी दृष्टिकोनातूनच शक्य होतो, असा आग्रह आपण मान्य करायलाच हवा असे नाही. मात्र असा निर्णय घ्यायचा झाला तरी त्यामुळे अभ्यासकासमोर अनेक नवे पद्धतिशास्त्रीय प्रश्न उभे राहतात. त्यांची सोडवणूक करण्याची बौद्धिक महत्त्वाकांक्षा आपल्या संस्कृतीमध्ये निर्माण करणे हे भलतेच अवघड काम आहे.

खास मराठी समीक्षेच्या संदर्भात विचार करताना समीक्षेच्या अनेकस्तरीयतेचा आणि अनेकविधतेचा प्रश्नही समाधानकारक रीतीने सोडवला जाणे गरजेचे आहे. वेगवेगळ्या प्रकारचे वेगवेगळ्या अवस्थांमधले वाचक तसेच उपलब्ध असलेले विविध संस्थात्मक अवकाश यांच्याशी सुसंवादी असलेले समीक्षालेखन होत राहणे ही साहित्यक्षेत्राच्या आरोग्याच्या दृष्टिकोनातून महत्त्वाची गोष्ट असते. उदाहरणादाखल, आपल्याला वर्तमानपत्रात येणारे ग्रंथपरिचय, वेगवेगळ्या टप्प्यावरील विद्यार्थ्यांच्या गरजा भागवणारे समीक्षालेखन, अधिक तपशिलात आणि सूक्ष्म विश्लेषणात उतरत केली जाणारी प्रत्यक्ष समीक्षा आणि सैद्धान्तिकतेच्या छटेपासून अधिक विद्वत्तापूर्ण म्हणता येईल अशी अकादमिक सैद्धान्तिक समीक्षा असे समीक्षेचे वेगवेगळे स्तर कल्पिता येतील. या सर्व स्तरांचे महत्त्व ओळखून त्या त्या स्तरावर अर्थपूर्ण कामगिरी होत राहणे गरजेचे ठरते. असे झाले नाही तर समीक्षेचे क्षेत्र दुराग्रहांनी भरून जाण्याची शक्यता असते.

सैद्धान्तिक तपशिलात उतरणारी समीक्षा केवळ मराठीत आहे म्हणून मराठी भाषकाला जाहिरात समजावी अशा सुलभतेने समजावी अशी अपेक्षा धरता येत नाही, तर वर्तमानपत्रात लिहिल्या जाणाऱ्या परिचयात विदग्धता नाही म्हणून नाक मुरडण्याचीही गरज नाही. विशिष्ट वयोगटातील विद्यार्थ्यांच्या गरजा लक्षात घेऊन त्यांच्या कल्पनाशक्तीचे भरणपोषण करील असे साहित्याचे व समीक्षेचे उत्तम संपादन सिद्ध करण्यात कोणतेही पाप नसते. अशी संपादने विद्यार्थ्यांची जाणीव घडवण्याचे काम करत असतात. या सर्व स्तरांवर नीट काम करणारे विद्वान ही कुठल्याही साहित्यसंस्कृतीची गरज असते. मराठी साहित्यसंस्कृतीमध्ये या विषयीची परिस्थिती काय आहे, असा प्रश्न उपस्थित करण्याचीही भीती वाटते, इतकी भयानक परिस्थिती आपल्या आजूबाजूला दिसते आहे. आपल्याला वर्तमानपत्रात उत्तम



अनुक्रमणिका

पुस्तक परिचय लिहिणारे समीक्षकही घडवता आलेले नाहीत व ते घडवण्याच्या संस्थात्मक यंत्रणा आपण नष्ट करून टाकल्या आहेत. साहित्यविषयक व्यासंगक्षेत्राचे मोठ्या प्रमाणातले निर्बौद्धिकीकरण आपण घडवून आणले आहे आणि त्यामुळे एखादा अभ्यासक चुकून सैद्धान्तिक तपशिलात उतरू लागला तर 'दुर्बोध... दुर्बोध' असे हाकारे देऊन वाचण्याअगोदरच त्याच्या लेखनाला कचऱ्याच्या टोपल्यात टाकण्याच्या व्यवस्था येथे निर्माण झाल्या आहेत. याची काय गरज आहे, हे कोण वाचणार, मग हे कशाला लिहायचे असे 'मूलभूत' प्रश्न उपस्थित करून गांभीर्यपूर्वक आणि नवे काही लिहिणाऱ्या लोकांच्या मुसक्या आवळल्या जात आहेत. या बाबतीत शिक्षणव्यवस्थेचे स्वरूप कसे आहे, त्यात मानव्यशास्त्रांना आणि साहित्याभ्यासाला काय महत्त्व आहे, साहित्य व मानव्यशास्त्र या क्षेत्राकडे येणारे विद्यार्थी कोण असतात, त्यांच्या गरजा कोणत्या असतात, त्यांना कोणत्या नोकऱ्या मिळणार असतात, त्यांच्या भोवताली रोरावत असणाऱ्या बाजारकेंद्री यंत्रणांशी त्यांचे काय नाते असते, असे अनेक प्रश्न उपस्थित करता येतात. या प्रश्नांच्या उत्तरांमधूनच मराठी समीक्षेची दारुण सद्यःस्थिती स्पष्ट होऊ शकते.

समीक्षेच्या विविध स्तरांप्रमाणे समीक्षेच्या वेगवेगळ्या प्रकारांविषयीची वस्तुस्थिती काय आहे, याचा शोध घेणे गरजेचे आहे. वाचणाऱ्या प्रत्येकाला त्याच्या स्वतःच्या वाचनानुभवाचा संदर्भ उपलब्ध असतो. या वाचनानुभवाच्या संदर्भाविषयी घेतल्या जाणाऱ्या भूमिकेनुसार समीक्षेचे वेगवेगळे प्रकार निर्माण होतात. एखादा वाचक-समीक्षक आपल्या वाचनानुभवाच्या वैयक्तिकतेपासून स्वतःला सुरक्षित अंतरावर ठेवण्याचा प्रयत्न करू शकतो. यातून वस्तुनिष्ठ समीक्षा हा प्रकार निर्माण होतो. ही वस्तुनिष्ठा साहित्यकृतीच्या रूपाशी निगडित ठेवली तर त्यामधून रूपवादी समीक्षा सिद्ध होते. पण वस्तुनिष्ठा फक्त रूपवादी संदर्भातच पाहता येते असे म्हणता येणार नाही. समाजशास्त्र, मानसशास्त्र, भाषाविज्ञान इत्यादी क्षेत्रांतील सिद्धान्तव्यूहाचा उपयोग करणारी समीक्षा, किंवा चरित्रात्मक समीक्षा किंवा साहित्यविषयक संकल्पनाव्यूहाच्या परिशीलनाला महत्त्व देणारी रा. भा. पाटणकरांची विदग्ध समीक्षापद्धती इत्यादी समीक्षाप्रकार वैयक्तिक वाचनानुभवाला समीक्षेच्या केंद्रस्थानी आणत नाहीत. असे असले तरी काही वाचक-समीक्षक जाणीवपूर्वक संहितविषयीचा स्वतःचा अनुभव समीक्षेच्या संदर्भात अपरिहार्य आणि महत्त्वाचा मानताना दिसतात. साहित्यकृतीने वाचकावर केलेला परिणाम अशा संस्कारवादी किंवा मराठीत आस्वादक या नावाने कुप्रसिद्ध असलेल्या समीक्षेचा अर्थपूर्ण संदर्भ असू शकतो.

समीक्षेचे असे अनेक प्रकार, समीक्षेची ही अनेक संभाषिते साहित्यसंस्कृतीमध्ये जाणीवपूर्वक लिहिली जात राहणे, समीक्षेच्या क्षेत्रात अनेक आवाज अस्तित्वात असणे, या आवाजांमध्ये तात्त्विक पातळीवरील संघर्ष असणे, हे संघर्ष समीक्षेच्या क्षेत्रात जबाबदारीने आणि उमदेपणाने निभावले जाणे ही गोष्ट समीक्षाव्यवहाराच्या निकोपपणासाठी आवश्यक असते. विशिष्ट परिस्थितीत या संभाषितांच्या नात्यामध्ये मुख्य-गौण भावही प्रवेश करण्याची शक्यता असते. असे असले तरी या संभाषितांमध्ये रूपांतरणे, स्थानांतरणे घडून येत असल्यामुळे समीक्षासमष्टीचा भाग म्हणून ती अवतरत राहणे गरजेचे असते. अनेकदा गौण समजले जाणारे संभाषितही नव्याच असाधारण क्षमता धारण करत पुढे येऊ शकते. गुप्तहेरकथा या लोकप्रिय संभाषिताचा उपयोग करत अत्यंत गंभीर कादंबरी लिहिता येते, तसेच समीक्षाक्षेत्राविषयीही म्हणता येते.

या वेगवेगळ्या संभाषितांमागे वेगवेगळ्या सैद्धान्तिक धारणा असल्यामुळे त्यांच्या मूल्ययुक्ततेविषयी वादविवादही होणे अगत्याचे ठरते. विसाव्या शतकाच्या शेवटच्या पंचवीसेक वर्षांत गाडगीळ, पाटणकर यांच्यामध्ये असे थोडेफार वाद झाले होते. ते आज आपण पूर्णपणे विसरून गेलो आहोत. या वादांचा नव्या पायावर विचार करण्याची गरजही आपल्याला वाटत नाही. आपण अमूक प्रकारची समीक्षा लिहितो आणि त्याची कारणे अशी अशी आहेत, असे कोणी बोलताना दिसत नाही. जणू काही याबद्दलच्या वादाच्या शक्यता गाडगीळ-पाटणकरांनी संपवून टाकल्या आहेत. पाटणकरांनी आस्वादक समीक्षा हा चकवा आहे आणि चरित्रात्मक समीक्षा हा समीक्षेचा अवैध प्रकार आहे असे सांगितल्यानंतर आणि गाडगीळांनी समीक्षाव्यवहारातील सौंदर्यशास्त्राचे स्थान नाकारल्यानंतर पुढे काहीही घडलेले नाही. वर स्पष्ट केलेले निर्बौद्धिकीकरण या प्रकारविषयक चर्चेवरही परिणाम घडवून आणते आहे असे म्हणता येईल. आज लिहिल्या जाणाऱ्या मराठी समीक्षेवर आस्वादक समीक्षेचाच प्रभाव आहे, तथापि तिचे सैद्धान्तिक महत्त्व स्पष्ट करण्याचा किंचितसाही प्रयत्न कोणी समीक्षक करताना दिसत नाही. ती उत्तरोत्तर उथळ, नाटकी, भावनांनी ओथंबलेली, वाचकाला बुद्धीचा उपयोग करायला न लावणारी होऊ लागली आहे. समीक्षा सैद्धान्तिक असो, चरित्रात्मक असो



अनुक्रमणिका

किंवा आस्वादक असो, तिचे स्वरूप मूलतः बौद्धिकच असते याचे भानही मराठी समीक्षेला, विशेषतः आस्वादक समीक्षेला राहिलेले नाही. मराठीतल्या फार थोड्या नियतकालिकांना आणि प्रकाशनगृहांना गांभीर्यपूर्वक लिहिल्या जाणाऱ्या समीक्षेत रस उरला आहे. वर्तमानपत्र वाचण्याच्या पद्धतीचा उपयोग करता येईल तेच समीक्षालेखन मायमराठीच्या विकासासाठी आवश्यक आहे असा आग्रह धरला जातो आहे. याच्या उलट्या दिशेला गेलो तर युरोपीय समीक्षेमधील तथाकथित 'समीक्षापद्धतीं'चे भूमिकानिरपेक्ष चिकित्साविरहित यांत्रिक उपयोजन कसे करायचे, याविषयीच्या हस्तपुस्तिकांना सैद्धान्तिक समीक्षेची प्रतिष्ठा प्राप्त होते आहे.

पुन्हा एकदा समीक्षेच्या प्रकारवैविध्याकडे व त्यांच्या वैध-अवैधतेकडे वळतो. खरे पाहता विशिष्ट प्रकारची समीक्षा लिहिण्याला तार्किक दृष्टिकोनातून वैध किंवा अवैध म्हणता येणे अवघड असते, कारण विशिष्ट प्रकारची समीक्षा लिहिली जाणे सामाजिक-सांस्कृतिक गरज असू शकते. समीक्षेच्या वेगवेगळ्या प्रकारांमागे विशिष्ट कालखंडाचे विश्वभानही असते. नव्या कालखंडात विशिष्ट प्रकारच्या समीक्षाप्रकाराची अर्थपूर्ण पुनर्रचनाही होऊ शकते. उदाहरणार्थ, युरोपीय संदर्भात बोलायचे झाल्यास पुनरुज्जीवनाच्या कालखंडात व्यक्तिलक्ष्यी मानवकेंद्रिततेचा उदय झाला आणि कवीचे चरित्र ही गोष्ट त्याच्या कवितेच्या संदर्भात अर्थपूर्ण ठरू लागली. त्यामुळे चरित्रात्मक समीक्षा हा खास आधुनिकतेचा प्रकल्प म्हणता येतो. पुढे आधुनिकतेच्या संदर्भात उभ्या राहणाऱ्या विविध प्रश्नांसमवेत कविचरित्राच्या संकल्पनेचा विस्तार किंवा संकोच होत गेलेला दिसतो. कविचरित्राला असलेले असे ऐतिहासिक संदर्भ स्पष्ट करून घेऊ लागलो की, चरित्रात्मक समीक्षा हा करमणुकीचा कार्यक्रम ठरत नाही.

हेच संस्कारवादी किंवा आस्वादक समीक्षेविषयीही बोलता येईल. तिच्या मुळाशी मूर्त, प्रत्यक्ष अनुभवाला दिली जाणारी मूल्ययुक्तता आहे आणि नवअभिजाततावादी आदेशात्मक यांत्रिकतेमधून मुक्त होण्याची इच्छा धरणाऱ्या रोमँटिक जाणिवेशी व रोमँटिक सौंदर्यशास्त्राशी तिचे जवळचे नाते आहे. समीक्षेच्या सर्जनशील रूपाची आस धरणारा हा प्रकार केवळ एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धाशी निगडित ठेवता येत नाही. संरचनावादी शास्त्रपूततेची विरचना करू पाहणाऱ्या जे. हिलिस मिलर, हॅरॉल्ड ब्लूम, पॉल डि मान अशा पश्चिमेकडच्या विरचनावादी समीक्षकांनाही संस्कारवादी समीक्षा महत्त्वाची वाटू लागली आहे आणि तिला अधिक समृद्ध करण्याचा प्रयत्न त्यांनी केला आहे. जॅक देरिदाला अभिप्रेत असलेले सौंदर्यशास्त्रही रोमँटिक वळणाचेच आहे. इतिहासाच्या प्रवाहात समीक्षेची कार्ये न बदलता, आहेत तशीच टिकून राहतात हा आग्रह सोडून समीक्षासमग्रतेच्या बाबतीत चिकित्सक समावेशक असणे ही आपल्या समीक्षेची आजची महत्त्वाची गरज आहे.

मराठीतील समकालीन समीक्षेसमोर अनेक प्रश्न येऊन उभे ठाकले आहेत. साहित्याला आणि साहित्याभ्यासाला बंदिस्त वर्तुळात ठेवून आज समीक्षेचा व्यवहार शक्य नाही. साहित्यव्यवहाराचा परामर्श घ्यायचा असेल तर समीक्षेला आज त्या व्यवहाराच्या केंद्राकडून परिघाकडे येऊन जाणिवांचा विस्तार स्पष्ट करणाऱ्या नव्या वर्तुळाची रचना करावी लागणार आहे. या नव्या वर्तुळात साहित्याभ्यासाशिवाय इतर ज्ञानशाखा एकत्र येतील आणि कुठल्या तरी संकुचित प्रावीण्यावर हक्क न सांगणारे अभ्यासक साहित्यव्यवहाराला त्याच्या भोवतालच्या सामाजिक आणि सांस्कृतिक व्यवहाराच्या समग्रतेशी नेऊन भिडवतील. साहित्यकृतीचे साहित्यप्रकारासारखे आणि शैलीसारखे विविध घटक, तिची अर्थनिर्णयने, संहिता आणि वाचक यांच्यामधील संबंध सामाजिक-सांस्कृतिक व्यवहाराशी व या व्यवहारावर आच्छादून राहणाऱ्या कल्पनाप्रणालीशी निगडित असतो आणि या वस्तुस्थितीचे सूक्ष्म विश्लेषण ही वर्तमान परिस्थितीत समीक्षेने स्वीकारायची जबाबदारी ठरली आहे. ही जबाबदारी स्वीकारण्याचे बौद्धिक आणि नैतिक सामर्थ्य समीक्षेमध्ये निर्माण होणे गरजेचे आहे. अशी जबाबदारी स्वीकारताना समीक्षकाला भोवतालच्या सामाजिक-सांस्कृतिक परिस्थितीविषयी काहीएक भूमिका घेणे गरजेचे आहे. बौद्धिक संधीसाधूपणा करीत वेगवेगळ्या ज्ञानशाखांची भूमिकारहित, सारसंग्रहात्मक सर्वसमावेशकता अनियंत्रित गोंधळाशिवाय दुसरे काहीही निर्माण करू शकत नाही. येथे समीक्षेच्या तथाकथित समाजशास्त्रीय, मानसशास्त्रीय वगैरे मराठी पद्धतींची आवर्जून आठवण काढावी लागते. या पद्धती नाहीत, तर दृष्टिकोन आहेत आणि या प्रत्येक दृष्टिकोनामध्ये परस्परांशी संघर्षरत असू शकतील अशा अनेक भूमिका उपस्थित असू शकतात, याचे भान नसेल तर या कथित पद्धतींच्या कथित उपयोजनामधून काहीही निष्पन्न होणार नाही. मराठी समीक्षेला सामाजिक-सांस्कृतिक भूमिका घ्यायला आवडत नसल्यामुळे असा भरपूर गोंधळ निर्माण होतो आहे. साहित्यकृतीचे वर्णनविश्लेषण करताना समाजशास्त्र आणि मूल्यमापन करताना रूपबंधाच्या



अनुक्रमणिका

कलात्मकतेचा परामर्श असा दुहेरी आणि दुटप्पी प्रमाणकांचा व्यवहारही अर्थपूर्ण समीक्षाव्यवहारामध्ये खात्रीने अडथळा आणणारा ठरणार आहे. आपल्याला अगदी स्वायत्ततावादी भूमिका मांडायची असली तरी ती कसून आणि बौद्धिक शिस्तीने मांडण्याची गरज असते. अशी महत्त्वाकांक्षा आणि शिस्त मराठी समीक्षेमध्ये अपवादानेच आढळून येते आहे.

समीक्षेसमोरील आव्हानांचे कथन उभारत असताना, असे सामर्थ्य मराठी समीक्षेमध्ये आज निर्माण होते आहे किंवा उद्या खात्रीने निर्माण होईल, असा आशावादी शेवट करायला मला आवडले असते. पण तसे करावे असे चित्र समोर दिसत नाही. मला यासाठी समीक्षकांना, समीक्षेच्या क्षेत्राला दोष द्यायचा नाही. या चित्रामागची कारणपरंपरा आपल्याला शोधता येते आणि ती आपल्या संस्थात्मक आयुष्यामधून स्वच्छपणे जाणवते आहे. समीक्षा पोकळीत निर्माण होत नाही. तिला विविध ज्ञानशाखांमध्ये उभारल्या जाणाऱ्या उपक्रमांमधून बळ मिळत असते. वेगवेगळ्या ज्ञानशाखांमध्ये सामाजिक चिंतनशीलतेला आकार देणारे अर्थपूर्ण व्यवहार सुरळीतपणे आणि दणकटपणे चालायचे असतील तर आपली शिक्षणव्यवस्था नीट असावी लागते. ती नीट असली तरच ज्ञानाच्या परंपरा निर्माण होतात व त्यांच्या जिवंतपणामधून समीक्षेच्या मुळाशी असलेल्या चिकित्सक क्षमता प्रगल्भ होतात. सतराव्या शतकानंतरच्या कालखंडात अशा काही परंपरा आपल्याला निर्माण करता आल्या आहेत असे म्हणता येत नाही.

स्वातंत्र्योत्तर कालखंडात आपल्या शिक्षणव्यवस्थेचे काय झाले आहे, हे आपण पाहतो आहोतच. तिच्यातील उदारमतवादी दृष्टिकोनामुळे तत्त्वज्ञानासह मानव्यशास्त्रांचे अस्तित्व कसेबसे तग धरून होते. जागतिकीकरण, बाजार, शिक्षणाचे खाजगीकरण, कौशल्याधिष्ठित प्रशिक्षणांना आलेले महत्त्व या सर्व घटकांना आलेल्या महत्त्वामुळे समीक्षेला, चिकित्सा करण्याला, विचार करण्याला पोषक असे वातावरण निर्माण करण्याची जबाबदारी शिक्षणक्षेत्राने पूर्णपणे झटकून टाकली आहे. जागतिकीकरणाच्या अरिष्टाने मराठी समीक्षेची (आणि साहित्याचीही) अक्षरशः गोची केली आहे. जागतिकीकरणाने निर्माण केलेल्या महाबाजारात उतरायचे असेल तर मराठीत लिहून भागत नाही. कारण या बाजारात मराठीचे दुकानच नाही. अगदी राष्ट्रीय पातळीवर धडपडायचे असेल तरी आपल्या समीक्षकांना आणि लेखकांना इंग्रजीत लिहायची कसरत करावी लागते. हे टाळण्यासाठी मराठीमध्येच आपला लेखनव्यवहार करायचा म्हटले तर जागतिकीकरणाच्याच दबावातून निर्माण झालेल्या संकुचित अस्मितांच्या सापळ्यात अडकण्याला पर्याय नाही. कुठलीही दिशा घ्यायची ठरवली तरी अरिष्टाला चुकवता येत नाही. त्यात संख्येने फुगत चाललेल्या नव्या मध्यमवर्गाला आता अंतर्मुख होण्याच्या दलदलीत दिसायचे नाही. त्याची विमाने आता भौतिक समृद्धीच्या अवकाशात ऐटीने उडू लागली आहेत. धोका स्वीकारत स्वतंत्रपणे विचार करण्याऐवजी सश्रद्ध होऊन एखाद्या दांडग्या बुवाचे अनुयायी होऊन श्रद्धेचे साहित्यशास्त्र निर्माण करणे या वर्गाला आवडू लागले आहे. अशा वातावरणात आपले अस्तित्व अर्थपूर्ण रीतीने टिकवणे समीक्षेसाठी खूप अवघड ठरणार आहे आणि तिला केवळ वैयक्तिक साहसीपणावर विसंबून राहावे लागणार आहे. असल्या एकाकी प्रयत्नांमधूनच बाजारशरणतेला विरोध करणाऱ्या आणि मराठीत असूनही चिकित्सक राहत संकुचित अस्मितांच्या मोहात न सापडणाऱ्या समीक्षा-संहिता निर्माण होण्याच्या शक्यता दडलेल्या आहेत. तुटक असली तरी अशा शक्यतांना पुरस्कृत करणारी परंपरा लगतच्या भूतकाळात दिसते आहे. तिला अधिक ठळक करण्याचे काम आपल्याला करायचे आहे.


**संदर्भ : मराठी**

- आचवल, माधव, रसास्वादाचे स्वरूप, समाविष्ट, मराठी समीक्षा, संपा. रा. श्री. जोग, वा. ल. कुलकर्णी, श्री. पु. भागवत, मुंबई विश्वविद्यालय, मुंबई, १९७२.
- जाधव, रा. ग., हस्तिदंती मनोऱ्याबाहेर, समाविष्ट, निवडक मराठी समीक्षा, संपा, गो. मा. पवार, म. द. हातकणंगलेकर, साहित्य अकादेमी, नवी दिल्ली, १९९९.
- जोग, रा. श्री., सहृदय कोण?, समाविष्ट, मराठी समीक्षा, संपा. रा. श्री. जोग, वा. ल. कुलकर्णी, श्री. पु. भागवत, मुंबई विश्वविद्यालय, मुंबई, १९७२.
- थोरात, हरिश्चंद्र, साहित्याचे संदर्भ, मराठी विभाग, मुंबई विद्यापीठ, मौज प्रकाशन, मुंबई, २००५.
- नेमाडे, भालचंद्र, टीकास्वयंवर, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, १९९०.
- पाटणकर, रा. भा., कमल देसाई यांचे कथाविश्व, मौज प्रकाशन, मुंबई, १९८४.
- पाटणकर, रा. भा.,साहित्यविचार आणि सौंदर्यशास्त्र, मराठी विभाग, मुंबई विद्यापीठ, मौज प्रकाशन, मुंबई, २००१.
- क्षीरसागर, श्री. के., आधुनिक टीका : शास्त्र की कला?, समाविष्ट, मराठी समीक्षा, संपा. रा. श्री. जोग, वा. ल. कुलकर्णी, श्री. पु. भागवत, मुंबई विश्वविद्यालय, मुंबई, १९७२.

**संदर्भ : इंग्रजी**

- Leitch, Vincent B., Theory Matters, Routledge, New York and London, 2003.
- Leitch, Vincent B., Editor, The Norton nthology of Theory and Criticism, second Edition, Introduction, W. W. Norton Company, New York and London, 2010.
- Wellek, Rene, Concepts of Criticism, Yale University Press, New Haven and London, 1963.



लेख

राजेंद्र बनहट्टी

# शांकरकथा

**१९८५ ते ८८ या काळात पाटील साहित्य परिषदेचे अध्यक्ष होते पण ते नाममात्र अध्यक्ष नव्हते. साहित्य परिषदेच्या सर्व योजना आणि उपक्रम यशस्वी करण्यात मोठा हातभार लावला होता. मुख्य म्हणजे अपंग, वृद्ध, आणि निराधार साहित्यिकांसाठी साहित्य परिषद जो साहित्यिक साहाय्य निधी जमवीत होती- अडीच लाखांचा निधी साहित्य परिषदेने जमविला आहे- तो निधी जमविण्यात शंकर पाटील यांचे फार मोठे योगदान आहे. आपल्या कथाकथनाचे कार्यक्रम महाराष्ट्रात ठिकठिकाणी करून त्यांनी हजारो रुपयांचा निधी साहित्य परिषदेसाठी उभा केला.**



मला आठवते की, शंकर पाटील यांच्याशी माझी पहिली भेट ही फर्ग्युसन कॉलेजातील प्राचार्य बाळ गाडगीळ यांच्या बंगल्यावर झाली. प्राचार्य बाळ गाडगीळ हे माझे जवळचे स्नेही होते. त्यांनी मला एकदा रात्री पार्टीसाठी बोलावले होते. त्यावेळी शंकर पाटील यांनाही त्यांनी आमंत्रित केले होते. त्या घटनेला आता पन्नास वर्षे सहज लोटली असतील. शिवाय ती भेट ही अगदी औपचारिक आणि जुजबी स्वरूपाची होती, पण तरीदेखील ती माझ्या अद्याप चांगली लक्षात राहिली आहे. वास्तविक शंकर पाटील यांची आकृती फारशी भरदार किंवा रुबाबदार नव्हती. पाटील तसे लहानखुरे, ठेंगणे, काळेसावळे पण त्यांचे डोळे बोलके होते आणि चेहरा हसरा होता. त्यामुळे त्यांच्या व्यक्तिमत्त्वात देखणेपणाची एक झाक होती. पण ती भेट मला अजून आठवते, याचे मुख्य कारण शंकर पाटील यांचा मनमोकळा, खेळकर, विनोदी आणि दिलखुलास स्वभाव. सहजगत्या बोलता बोलता आणि अनपेक्षित विनोद करण्याची त्यांची लकबही त्यावेळी माझ्या ध्यानात आली. त्यांच्याशी पुढे काही फारसा संबंध येईल किंवा आमची दोघांची घनिष्ठ मैत्री होईल याची मला सुतराम कल्पना नव्हती, पण योगायोग वेगळाच होता.

पहिल्या भेटीनंतर अधून मधून शंकर पाटील यांच्याशी कधीतरी गाठ पडत होती, पण आमची जवळीक वाढली ती महाराष्ट्र साहित्य परिषदेत. मला वाटते १९८५ साली मी साहित्य परिषदेचा कार्याध्यक्ष झालो. त्याचवेळी कर्मधर्मसंयोगाने पाटील हे परिषदेचे अध्यक्ष म्हणून निवडले गेले. साहित्य परिषदेत बैठकीच्या आणि इतर कामांच्या निमित्ताने आमच्या वारंवार गाठीभेटी होऊ लागल्या. जवळ जवळ रोजच आम्ही भेटू लागलो. साहित्य परिषदेचे काम संपल्यावरही जवळपासच्या हॉटेलमध्ये आमच्या गप्पांचा फड रंगू लागला. शिवाय शंकर पाटील अनेकदा काहीना काही निमित्ताने किंवा निमित्ताशिवायही त्यांच्या घरी मला आणि परिषदेतल्या काही जवळच्या सहकाऱ्यांना पार्टीला बोलवत असत. एकदा तर त्यांच्या घरच्या कुंडीत ब्रह्मकमळ फुलले म्हणून त्यांनी पार्टी दिल्याचे मला आठवते. साहित्य परिषदेच्या कामानिमित्ताने त्यांच्या घरीही आमच्या भेटी होऊ लागल्या. मी त्यांना कधी फोन केला की परिषदेत संध्याकाळी येणार का? अमुक अमुक कामाबद्दल बोलायचे आहे असे विचारी, तर त्यावर पुष्कळदा ते म्हणत, 'तुम्हीच माझ्या घरी याना. कामाचे बोलणे उरकले की गप्पा मारत बसू.' गप्पा म्हणजे पार्टी आणि नंतर सुग्रास भोजन. शंकर पाटील हे उत्कृष्ट यजमान (host) होते. त्यांच्या घरचे सामिष जेवण हे








अनुक्रमणिका



अतिशय चविष्ट आणि रुचकर असे. आमच्यापैकी जे शाकाहारी होते त्यांच्यासाठी शाकाहारी जेवणाची मेजवानी असायची. काम आटोपले की पार्टी, भोजन आणि गप्पा बहरत जायच्या त्या थेट रात्रीचे बारा वाजेपर्यंत. मग पाटील दाराशी पोचवायला येत आणि सांगत, "हे पाहा, उशीर झाला आहे पण गाडी सावकाश चालवा. जपून जा. घरी गेल्यावर फोन करा."

१९८५ ते ८८ या काळात पाटील साहित्य परिषदेचे अध्यक्ष होते पण ते नाममात्र अध्यक्ष नव्हते. साहित्य परिषदेच्या सर्व कार्यात त्यांनी मोठ्या हिरिरीने भाग घेतला होता. साहित्य परिषदेच्या सर्व योजना आणि उपक्रम यशस्वी करण्यात मोठा हातभार लावला होता. मुख्य म्हणजे अपंग, वृद्ध, आणि निराधार साहित्यिकांसाठी साहित्य परिषद जो साहित्यिक साहाय्य निधी जमवीत होती- अडीच लाखांचा निधी साहित्य परिषदेने जमविला आहे- तो निधी जमविण्यात शंकर पाटील यांचे फार मोठे योगदान आहे. आपल्या कथाकथनाचे कार्यक्रम महाराष्ट्रात ठिकठिकाणी करून त्यांनी हजारो रुपयांचा निधी साहित्य परिषदेसाठी उभा केला. कथाकथनाच्या कार्यक्रमाला त्यांच्याबरोबर जाण्याची संधी अनेकदा आम्हाला मिळाली. त्यावेळी असं दिसून आलं की कथाकथन हे शंकर पाटील यांचं एक फार मोठं सामर्थ्य होतं. कथाकथनाची कला त्यांनी जवळजवळ पूर्णत्वास नेलेली होती. त्यासाठी त्यांनी जाणीवपूर्वक प्रयत्न केले होते. स्वतःला शिस्त लावून घेतली होती. पाटील स्वतः ग्रामीण भागातले असूनही चंची बाळगत नसत. ते पान, तंबाखू, सुपारी या पिंक संप्रदायातले नव्हते. विचारलं तर 'पान, तंबाखू, सुपारी यांनी जीभ जड होते. विडीकाडीने घसा घराब होतो. मला कथाकथन करायचं म्हणजे जीभ स्वच्छ नि घसा मोकळा हवा. म्हणून मला हे सगळं वर्ज्य आहे,' असे ते सांगत. स्वतःला अशी बंधने घालून त्यांनी कथाकथनाची कला आत्मसात केली होती.

परंतु त्यांचं कथाकथन म्हणजे केवळ विनोद, केवळ मनोरंजन, केवळ दोन घटका करमणूक असा प्रकार नव्हता. त्यात एक निखळ वाङ्मयीन आनंद होता. केवळ लोकांना हसवण्यासाठी, केवळ लोकप्रियता मिळवण्यासाठी किंवा केवळ व्यवसाय म्हणूनही शंकर पाटलांनी कथाकथनाचे कार्यक्रम केले नाहीत. जास्तीत जास्त लोकांना साहित्याचा आस्वाद घेता यावा, वाङ्मयाचा आनंद लुटता यावा म्हणून त्यांनी कथाकथन केलं. कारण शंकर पाटील हे काही ivory tower मध्ये राहणारे, हस्तिदंती मनोऱ्यातले, समाजापासून दूर राहणारे अलिप्त लेखक नव्हते. आम्ही आपले स्वतःसाठी लिहितो. स्वान्तःसुखाय लिहितो, ते कोणाला समजो वा न समजो, ते कोणी वाचो वा न वाचो त्याची फिकीर नाही, अशा मिजाशीत आणि गुर्मीत जगाकडे पाठ फिरवून घरी निवांत बसून राहणारे ते मुजोर लेखक नव्हते. ते प्रत्यही समाजात मिसळणारे, समाजाच्या सुखदुःखांशी तन्मय होणारे समाजाभिमुख लेखक होते. कारण अखेरीला साहित्य हे केवळ पुस्तकात छापून लायब्ऱ्यांच्या कपाटात बंदिस्त करून ठेवण्यासाठी नसतं. ते केवळ मूठभर वाचकांसाठीही नसतं तर ते वाचकांपलीकडे पसरलेल्या विशाल समाजासाठी असतं, साहित्य हे साहित्यापलीकडच्या अफाट जगासाठी असतं, ही जाणीव पाटील यांना होती. त्यामुळे त्यांनी महाराष्ट्रात आणि महाराष्ट्राबाहेरही गावोगावी, खेडोपाडी आपल्या कथाकथनाचे हजारो कार्यक्रम केले. वाचकांच्या पलीकडे म्हणजे खेडोपाड्यातल्या निरक्षर जनतेपर्यंत त्यांनी आपली कथा पोचविली. त्या अशिक्षित लोकांना त्यांनी केवळ साहित्याचा आनंद दिला नाही तर त्यांच्यावर साहित्याचे संस्कार केले. त्यांनी सांगितलेला एक प्रसंग इथे आठवतो. कोल्हापूर जवळच्या एका खेड्यात त्यांचं कथाकथन झालं. त्यानंतर सात-आठ मंडळी त्यांना भेटायला आली. पाटलांचे कथाकथन ऐकून ती भारावलेली होती. ते लोक पाटलांना म्हणाले, "आम्हाला तुमच्या कथा वाचायच्या आहेत." पाटील म्हणाले, "मग वाचा ना. इथे शाळेत पुस्तकं आहेत का पाहा. नाहीतर कोल्हापूरला मिळतील." ती मंडळी म्हणाली, "पुस्तकं मिळतील हो. पण वाचायची कशी? आम्हाला वाचता येत नाही. आम्हाला वाचायला शिकायचंय." पाटील म्हणाले, "इथल्या मास्तरांना विचारा. इथे प्रौढांसाठी साक्षरतेचे वर्ग आहेत का पाहा." म्हणजे पाटलांचं कथाकथन ऐकून कथा वाचण्याची, वाचायला शिकण्याची प्रेरणा त्या अशिक्षित लोकांना मिळाली होती. माणसाला शिक्षित करणं, सुसंस्कृत करणं, हेच जर साहित्याचं प्रयोजन असेल तर जे पाटील यांनी एक लेखक म्हणून साध्य केलं होतं.

पण हे पाटलांनी केलं, त्यांना जमलं ते केवळ त्यांच्या कथाकथन कौशल्यामुळे नाही, ते केवळ कथाकथन कमालीचं रंगवायचे म्हणून नाही तर ते ज्या कथा सांगायचे त्या त्यांच्या कथा अस्सल साहित्य होतं, जीवनदर्शन घडवणारं प्रत्ययकारी साहित्य होतं म्हणून त्यांना हे साध्य झालं. कारण पाटील हे सर्वप्रथम अभिजात कथाकार होते.

**ग्रामीण स्त्रीचं मन, तिचं व्यक्तित्व हा पाटलांच्या कथेचा मुख्य गाभा आहे. ग्रामीण स्त्रीच्या रूपानं ग्रामीण जीवनातलं सगळं कारुण्य त्यांनी मराठी कथेत आणलं आहे. या स्त्रीला ग्रामीण समाजरचनेत, ग्रामीण कुटुंबव्यवस्थेत महत्त्व नाही. पण पाटलांच्या कथेत विलक्षण महत्त्व आहे. कारण पाटलांच्या कथेत ग्रामीण स्त्री ही व्यक्ती म्हणून वेगळी आहे. म्हणजे या स्त्रीची व्यक्तीनुरूप विविध प्रकारची रूपं, तिच्या दुःखाचे वेगवेगळे आविष्कार त्यांच्या कथेत प्रकट झालेले आहेत. त्यामुळे त्या स्त्रीचं दुःख, तिची वेदना ही ठोकळेबाज आणि एकसुरी उमटलेली नाही.**



नंतर ते कथाकथनकार झाले. मराठीतले अव्वल दर्जाचे कथाकार म्हणून आपण त्यांना ओळखतो. शंकर पाटील हे ग्रामीण जीवनातून आलेले होते. ते मूळचे कोल्हापूर जवळच्या पट्टणकोडोली गावचे होते. ग्रामीण जीवनाचे अमिट असे संस्कार त्यांच्यावर झाले होते. त्यांनी आपल्या कथेतून ग्रामीण जीवनाचे अस्सल दर्शन सातत्याने घडवले आहे. म्हणून आपण त्यांना ग्रामीण कथाकार म्हणतो, पण ते नुसते ग्रामीण कथाकार नव्हते. १९५०-६०च्या दरम्यान जी नवकथा मराठीत उदयाला आली, तिचे ते एक शिल्पकार होते. ही नवकथा कशी होती? तर ती व्यक्तिवादी होती. व्यक्तिविशिष्ट होती, individualistic होती. म्हणजे ती व्यक्तीच्या मनाचा, तिच्या अंतरंगातील आंदोलनांचा शोध घेणारी होती. व्यक्तीला महत्त्व, व्यक्तीच्या मनाचं चित्रण, माणसाच्या व्यक्तित्वाचं दर्शन हे नवकथेचं एक व्यवच्छेदक लक्षण आहे. पाटलांनी नवकथेच्या या व्यक्तिवादी नजरेतून ग्रामीण जीवनाकडे पाहिलं ही त्यांची अपूर्वाई आहे. म्हणून पाटलांच्या ग्रामीण कथा या प्रामुख्याने ग्रामीण व्यक्तींच्या कथा आहेत. त्यांच्या कथांमध्ये कथानकाची गुंतागुंत नाही, नाट्यमय प्रसंगांचे चढउतार नाहीत, भडक घटनांची रेलचेल नाही, चमकदार संवादांची फेकाफेक नाही. त्यांच्या कथेतून समोर उभी राहते ती ग्रामीण व्यक्ती. त्यांची कथा ही त्या व्यक्तीच्या व्यक्तिमत्त्वाचा शोध आहे, तिच्या मनाचे चित्रण आहे. पण पाटलांच्या या ग्रामीण कथेत जे ग्रामीण व्यक्तित्व आहे, जे ग्रामीण मन आहे, ते प्रामुख्याने कोणाचं आहे? कोणाच्या सुखदुःखाला त्यांनी वाचा फोडलेली आहे? कोणाच्या व्यक्तित्वाचा त्यांनी शोध घेतलेला आहे?

तसं पाहिलं तर पाटलांचं कथाविश्व हे तऱ्हेतऱ्हेच्या ग्रामीण व्यक्तींनी गजबजलेलं आहे. ग्रामीण जीवनातील गमतीदार विसंगतीवर आधारलेल्या त्यांच्या 'धिंड', 'पाहुणचार', 'टाकीचे घाव', 'मिटींग' यांसारख्या विनोदी कथांमध्ये अनेक इरसाल ग्रामीण माणसं त्यांनी हुबेहूब साकार केलेली आहेत. त्यांच्या कथांमध्ये अनेक बिलंदर ग्रामीण माणसांचे नमुने आहेत. त्यांच्या 'वळीव', 'आभाळ', 'भूल', 'ऊन' यांसारख्या कथांमध्ये तर निसर्गालाच एक व्यक्तिमत्त्व, एक कॅरेक्टर प्राप्त झालेलं आहे. या कथांमध्ये उन्हाची खाई उसळते. भूमी खेंडागत धगधगते, म्हातारा पाऊस काठी टेकत येतो. अंगणात वाळवण पसरावं तसा गारांचा सडा पडतो, असा बोलका निसर्ग आहे. निसर्गाप्रमाणेच पाटलांच्या बहुतांश कथांमध्ये ग्रामीण कुटुंबव्यवस्थेचं चित्रण आहे. ही कुटुंबव्यवस्था पुरुषप्रधान आहे. पुरुष हा कुटुंबाचा प्रमुख आहे, कर्ता आहे. म्हणून पुरुषांना या कुटुंबजीवनात महत्वाचं स्थान आहे. अनेक पुरुष मंडळींची गर्दी पाटलांच्या कथेत आहे. पण या सगळ्या व्यक्ती जरी असल्या तरी पाटलांच्या बहुतेक कथांमधून ठसठशीतपणे, अटळपणे, गडदपणे आणि जिवंतपणे उभी राहते ती व्यक्ती म्हणजे ग्रामीण स्त्री ही आहे.

ग्रामीण स्त्रीचं मन, तिचं व्यक्तित्व हा पाटलांच्या कथेचा मुख्य गाभा आहे. ग्रामीण स्त्रीच्या रूपानं ग्रामीण जीवनातलं सगळं कारुण्य त्यांनी मराठी कथेत आणलं आहे. या स्त्रीला ग्रामीण समाजरचनेत, ग्रामीण कुटुंबव्यवस्थेत महत्त्व नाही, पण पाटलांच्या कथेत विलक्षण महत्त्व आहे. कारण पाटलांच्या कथेत ग्रामीण स्त्री ही व्यक्ती म्हणून वेगळी आहे. म्हणजे या स्त्रीची व्यक्तीनुरूप विविध प्रकारची रूपं, तिच्या दुःखाचे वेगवेगळे आविष्कार त्यांच्या कथेत प्रकट झालेले आहेत. त्यामुळे त्या स्त्रीचं दुःख, तिची वेदना ही ठोकळेबाज आणि एकसुरी उमटलेली नाही. त्यांच्या 'लोडणा' या कथेतील स्त्री बोलतच नाही. ती नुसतं दुःख सोसते. नवऱ्यानं विहिरीत ढकलून दिल्यानंतरच तिची दुःखातून कायमची सुटका होते. 'सारवण' कथेतील हिरा बोलते पण तिचा नशिबावर हवाला आहे. नशिबात असेल ते

निमूटपणे ती भोगणारी आहे. ती म्हणते, 'कुणाला सांगायचं नाही, काय नाही. आपलं आपुन सोसायचं. आतल्या आत गिळायचं. होतंय तवर करायचं. खुटलं की गप्प बसायचं.' 'भुजंग' या प्रसिद्ध कथेतील जनाई ही आणखी वेगळी आहे. घरात आयतोबा, खादाड, खुळचट नवरा आणि शेतात फिरणारा आणि तिला काम करू न देणारा भुजंग यांच्या कचाट्यात सापडून तिचा कोंडमारा झालेला आहे. पण तरीदेखील आपला चार मुलांचा संसार सावरण्याची, जगवण्याची आणि नवऱ्याला सांभाळण्याची तिची जिवापाड धडपड चालू आहे. त्यासाठी ती निधडेपणे शेतात काम करायला जाते आणि तिला अडवून समोर डुलणाऱ्या भुजंगाला खंबीरपणे सुनावते, ''लई डुलायला लागलाईस! कोन गानं म्हणतंय व्हय इथं? जन्माचं गानं झालंय माझ्या! ऐकलंस?'' 'वळीव' कथेमध्ये तात्या देसाईची म्हातारी कारभारीण इतकी मायाळू आहे की, कोसळणाऱ्या पावसात आणि विजांच्या कडकडाटात रानामध्ये अडकलेल्या पायाळू तात्याला अपाय होऊ नये म्हणून पुतण्याबरोबर ताव्यांची अंगठी पाठविते. अशी विविध रूपांतील ग्रामीण स्त्री पाटलांनी आपल्या कथेमध्ये इतकी खरी, इतकी अस्सल, इतकी हाडामांसाच्या माणसासारखी सजीव केली आहे की, असं वाटतं की तिला नुसतं टोचलं तरी रक्त येईल.

पण पाटलांच्या कथेतील ग्रामीण स्त्री ही अशी भिन्न भिन्न व्यक्तिरूपांमध्ये आणि आई, बहीण, भावजय, नणंद, सासुरवाशीण, कारभारीण अशी निरनिराळ्या नात्यांनी वावरत असली तरी अखेरीला ग्रामीण संस्कृतीच्या ग्रामीण समाजव्यवस्थेच्या आणि कुटुंबपद्धतीच्या समान धाग्यांनी बांधली गेलेली आहे. या कुटुंबव्यवस्थेतील ती सर्वांत शोषित व्यक्ती आहे. पण तिच्यामुळेच ही कुटुंबव्यवस्था टिकलेली आहे. कुटुंबातील पुरुषांच्या दृष्टीने तिचे अस्तित्व नगण्य आहे, पण तिच्यामुळेच पुरुषाच्या अस्तित्वाला अर्थ आहे. संसारात तिला प्राधान्य नाही पण तिच्यामुळेच संसार तगलेला आहे. कारण तिचे जगणे हे सर्वस्वी तिच्या संसाराकरिता, कुटुंबाकरिता आहे. कुटुंब हेच तिचे जग आहे. आणि त्यासाठी अगणित कष्ट आणि अविरत हालअपेष्टा हा तिचा अटळ असा भोग आहे, पण त्यामुळे ती गांजलेली असली तरी पिचलेली नाही. कारण तिच्या काही निष्ठा आहेत, श्रद्धा आहेत, धर्म आहे. आणि तोच तिचा खरा आधार आहे. त्यामुळे ती वावरलेली असली तरी पळपुटी नाही. दडपलेली असली तरी दुबळी नाही. मोडलेली नाही. म्हणूनच ती संकटात बेधडक सामोरी जाते आणि कर्तव्यालाही कधी चुकत नाही.

शंकर पाटलांची कथा ही प्रामुख्याने या अबोल, कष्टाळू, कर्तव्यदक्ष, निष्ठावान, सोशिक अशा ग्रामीण स्त्रीची कथा आहे. पाटलांच्या कथेतील ही स्त्री ग्रामीण, खेडवळ, मागासलेली, अशिक्षित, परावलंबी आणि परतंत्र आहे. तिचा नशिबावर, दैवावर हवाला आहे. तिने कुटुंबात आपले अस्तित्व, आपले सत्त्व विलीन करून टाकले आहे. तिच्या निःस्वार्थ पण उपेक्षित दुर्लक्षित व्यक्तित्वाचा शोध ही पाटलांच्या बहुतांश कथांची प्रेरणा आहे. त्यांच्या कथेतील अनुभव तिच्याभोवती गुंफले गेले आहेत. म्हणून पाटलांची ग्रामीण कथा ही प्रामुख्याने स्त्रीप्रधान आहे. अशा ग्रामीण माणसाच्या विशेषतः ग्रामीण स्त्रीच्या व्यक्तित्वाचा, मनाचा, अंतरंगाचा, सुखदुःखांचा शोध घेणारी खरीखुरी ग्रामीण नवकथा मराठीत पाटलांनीच प्रथम लिहिलेली आहे. त्यामुळे केवळ नवकथाकार म्हणून नव्हे, नुसते कथाकार म्हणूनही नव्हे तर ग्रामीण स्त्रीत्वाचे वास्तव दर्शन घडविणारे मराठीतले पहिले ग्रामीण नवकथाकार म्हणून पाटलांचे स्थान मराठी साहित्यात अढळ आहे. ■

**राजेन्द्र बनहट्टी**
'समानधर्मा', नवकेतन १ली गल्ली,
१२८-२-२५ कोथरूड,
पुणे - ४११०२९
दूरध्वनी : ०२०- २५४६८६५३



**हार्दिक अभिनंदन!**

किर्लोस्कर वसुंधरा जीवनगौरव पुरस्कार अ.भा.मराठी साहित्य संमेलनाचे माजी अध्यक्ष मारूती चितमपल्ली यांना जाहीर. पुरस्काराचे वितरण ८ जानेवारी २०१८ रोजी होणार. त्यांचे हार्दिक अभिनंदन!



अनुक्रमणिका



समीक्षा

प्रा. उमेश मारुती सिरसट

# 'कोसला'तील घराची आदिप्रतिमा



**भालचंद्र नेमाडे ह्यांची 'कोसला' ही कादंबरी अतिशय आशयसंपन्न आणि बहुआयामी आहे. कादंबरीत वेगवेगळ्या ठिकाणी 'घर' ह्या आदिप्रतिमेचा उल्लेख पाहायला मिळतो. 'घर' ही माणसाची आवश्यक गरज आहे. ज्याप्रमाणे प्रत्येक मनुष्यास मातेची आवश्यकता असते, त्याचप्रमाणे 'घर' हीदेखील आवश्यक गोष्ट आहे. मातेच्या जवळ सुरक्षितता, आपलेपणा, जिव्हाळा, प्रेम, ह्या भावनांचा अनुभव येत असतो. त्याचप्रमाणे 'घर' हे माणसाला ह्या भावनांनी बांधून ठेवत असते.**



'कोसला' (१९६३), 'बिढार' (१९७५), 'हूल' (१९७५), 'जरीला' (१९७७), 'झूल' (१९७९), 'हिंदू-जगण्याची समृद्ध अडगळ' (२०११) ह्यासारख्या समृद्ध कादंबऱ्या भालचंद्र नेमाडे यांनी लिहिलेल्या आहेत. कोसला ही एक क्रांतिकारक कादंबरी आहे. रेखा इनामदार-साने म्हणतात, ''कोसलासारख्या क्रांतिकारक कादंबरीचा आवाका इतका मोठा आहे की, तिचे अर्थनिर्णयन अन्य समीक्षा दृष्टींनीही करता येईल. किंबहुना साहित्यकृतीच्या श्रेष्ठत्वाचे हे एक गमक मानता येईल.''[१] ह्या विधानामधून कोसलाची व्यामिश्रता आणि व्यापकता लक्षात येते. कोसला कादंबरीचा आदिबंधाच्या दृष्टिकोनातूनही विचार करता येऊ शकतो. कोसलाविषयी अविनाश सप्रे म्हणतात, ''एखाद्या अणूमध्ये प्रचंड सामर्थ्य एकवटावं, तसं कोसलामध्ये घडलेले आहे. ग्रामीण आणि नागर जीवनाचे सगळे सांस्कृतिक, सामाजिक, शैक्षणिक, भौतिक, आर्थिक आणि तात्त्विक संदर्भ एकवटून पांडुरंगाच्या रूपानं एक 'अॅबसर्ड-मॅन' इथे निर्माण करण्यात आला आहे. निर्भय, निर्मळ आणि निरागस मनानं अर्थशून्यतेला सामोरे जाणाऱ्याचे कोसला हे एक कलात्मक मनोगत आहे. क्वचित एखाद्यालाच जे साधते, ते भालचंद्र नेमाडेंना इथे सहज साध्य झाले आहे, म्हणूनच त्यांचे आणि कोसलाचे अप्रूप !''[२]

भालचंद्र नेमाडे ह्यांची 'कोसला' ही कादंबरी अतिशय आशयसंपन्न आणि बहुआयामी आहे. ह्या कादंबरीत येणाऱ्या चित्रणावरून ह्या कादंबरीत काहीतरी गूढ, अनाकलनीय आदिम अनुभवाची मूस असावी, याचा प्रत्यय ही कादंबरी वाचताना येतो. कादंबरीत वेगवेगळ्या ठिकाणी 'घर' ह्या आदिप्रतिमेचा उल्लेख पाहायला मिळतो. 'घर' ही माणसाची आवश्यक गरज आहे. ज्याप्रमाणे प्रत्येक मनुष्यास मातेची आवश्यकता असते, त्याचप्रमाणे 'घर' हीदेखील आवश्यक गोष्ट आहे. मातेच्या जवळ सुरक्षितता, आपलेपणा, जिव्हाळा, प्रेम, ह्या भावनांचा अनुभव येत असतो. त्याचप्रमाणे 'घर' हे माणसाला ह्या भावनांनी बांधून ठेवत असते. म्हणूनच ह्या आदिम अनुभवाच्या मुशीतून घराची प्रतिमा साहित्यात साकार होते. कोसलामधील पांडुरंग सांगवीकरला ह्या समाजातील भंपकपणा, खोटारडेपणा दिसतो आहे. त्यामुळेच तो त्यांच्यात रमत नाही. त्यापासून स्वतःला वेगळा समजतो आहे. एक प्रकारे त्याने आपल्या मुखवट्यावर प्रहार केला आहे. आपल्या मुखवट्यावर प्रहार करून तो अचेतनाच्या खोल प्रदेशात उतरला आहे. त्यामुळेच त्याला





अनुक्रमणिका






आजूबाजूचे लोक भंपक वगैरे वाटतात. या सामूहिक अचेतनाच्या प्रदेशात त्याला अनेक आर्ष घटक दिसतात. त्यात मातेच्या अनुभवाची मूसही आहे. ही मातेच्या अनुभवाची आदिम मूस घराच्या आदिप्रतिमेत कादंबरीत आविष्कृत झाली आहे. कोसलामध्ये ह्या आदिप्रतिमेचा प्रत्यय येतो. मुळात कादंबरीच्या शीर्षकातच 'घर' हा अर्थ दडलेला आहे. शरद पाटील म्हणतात, ''कोसला म्हणजे सुरवंटाचा कोश. पांडुरंग सांगवीकरला वर्गीयजातीय समाज कोषातच मारतो. त्याच्या मध्यम जातीयतेमुळे तो जातिविद्रोहाचे फुलपाखरू बनून बाहेर पडू शकत नाही. देवाचे अन्न सर्वत्र पसरलेले आहे, पण तो प्रेत बनल्याने त्याला ते खाता येत नाही.''[३] सांगवीकर हा आपल्या लौकिक पातळीवरच्या घरापासून तुटला आहे. घराबद्दलच्या त्याच्या भावना संमिश्र अशा आहेत. घराविषयी प्रेम आणि द्वेष अशा अंतर्विरोधी भावना त्याच्या मनात आहेत. घर हा त्याच्या अस्मितेचा, अस्तित्वाचा प्रश्न बनला आहे. लहानपणापासून त्याला घराविषयी बरेच काही काही वाटते. लहानपणी पडलेल्या वेगवेगळ्या स्वप्नातही त्याला ही घराची आदिम प्रतिमा जाणवते. एका स्वप्नाविषयी तो सांगतो, ''आमच्या गावातली सगळी घरं आपोआप एकदम समोर चालायला लागली आहेत. त्यात एखादं घर म्हणजे मी. काही मजबूत घरं. काही उंच घरं. बारक्या घरांना जमीनदोस्त करून पुढे. सगळी घरं रेड्यांच्यासारखी एकमेकांना रेटत आहेत. मोठ्ठीच गर्दी. पण आवाज अजून कशाचाच कसा होत नाही? म्हणून मी घाबरून ओरडत उठलो.'' (कोसला-पृ.८) ह्या ठिकाणी आदिबंधात्मक ललित घटना किंवा आर्किटायपल सिच्युएशन निर्माण झाली आहे. ''आदिबंधरूप प्रतिमा ज्या स्वप्नात, फॅन्टसीत, कलाकृतीत, मिथमध्ये प्रकट होतात, तेथे एक 'आदिबंधरूप घटना' (आर्किटायपल सिच्युएशन) निर्माण होत असते. सामूहिक नेणिवेला व्यक्त करणाऱ्या या आदिबंधरूप प्रतिमा व्यक्तिमनात एक कल्पनाशील, स्वप्नशील भावविश्व साकार करीत असतात.




आदिबंधांनी प्रभावित झालेल्या या भावविश्वाला 'आर्किटायपल' किंवा 'ट्रान्सपर्सनल' भावविश्व म्हटले जाते. या अतिमानुषी, कल्पनानिष्ठ (इमॅजिनेटिव्ह) भावविश्वाला 'आदिबंधरूप भावविश्व' असे संबोधणे युक्त होईल.''[४] आदिबंधरूप भावविश्व व्यामिश्र, अंतर्विरोधात्मक व अनाकलनीय असते. ''मनोगंडांनी ग्रस्त झालेले भावविश्व हे व्यक्तिगत नेणिवेचे अंग बनलेले असते; तर आदिबंधांनी प्रभावित झालेले हे भावविश्व तत्त्वतः सामूहिक नेणिवेचे आशयांग असते.''[५]

कोसलामधील घराची आदिप्रतिमा महामातेच्या आदिबंधाला आविष्कृत करत आहे. महामातेचा आदिबंध स्वयंभू, स्वयंपूर्ण असतो. म्हणूनच सांगवीकर सामूहिक नेणिवेतील ह्या आदिम मातेशी एकरूप होऊ पाहत आहे. घर ह्या आदिप्रतिमेचा प्रभाव संपूर्ण कादंबरीभर पाहायला मिळतो. सांगवीकरला आणखी एका स्वप्नात दिसते की, ''भिंतीवर बसवलेल्या एका चकचकीत खड्यात ताजमहालासारखी इमारत दिसते. पण कुणीतरी मागे पाहा म्हणतो. तेव्हा मला मागे कोणतीच इमारत दिसत नाही.''(कोसला-पृ.८) ही स्वप्ने गूढ, अनाकलनीय, अंतर्विरोधात्मक आहेत. म्हणूनच या ठिकाणी आर्किटायपल सिच्युएशन तयार झाली आहे. सांगवीकर आपल्या जाणिवेतून सामूहिक अचेतनाच्या खोल प्रदेशात उतरला आहे. लौकिक पातळीवरील घरापासून तो तुटला आहे. परंतु त्याला काही तरी करून दाखवण्यासाठी शहरात जायचे आहे. म्हणून तो शहरात येतो. येथे 'शहर' हेही महामातेच्या आदिप्रतिमेत अवतरते आहे. ''नगर हे अनेकदा मातेच्या आदिबंधाचे प्रतीक मानले जाते. तेथे अन्न आणि निवारा यांचा लाभ जीवमात्राला होत असतो. म्हणून तर माणसांचे लोंढे शहराकडे वाहत जातात.''[६] सांगवीकरही काहीतरी करून दाखवण्याच्या हेतूने पुण्यात येतो, नंतर नोकरीच्या शोधात मुंबईलाही जातो. हे येथे सूचक आहे.

सांगवीकरला आपले जुनाट जंगी घर आवडते आहे. त्या घरावर त्याचे प्रेम आहे. आईवरही त्याचे प्रेम आहे. परंतु वडिलांविषयी त्याला प्रेम नाही. म्हणूनच हे घर त्याला नकोसे वाटते.

तो म्हणतो, ''मग मी एका कुशीवर वळलो. तिथून मुंग्यांची प्रचंड जाडजूड रांग मोठ्या घाईघाईनं जात होती. अजून सकाळ होत आहे. आणि ह्या मुंग्या कामातच. त्यांनी हे घरच पोखरलं असेल. ह्या काही शंभर-दोनशे नाहीत. लाखो दिसतात. रात्रभर यांचं काहीतरी चालूच राहत असेल. पण बरं आहे. हे घर एकदाचं पोखरून नेस्तनाबूत होईल.'' (कोसला -पृ.१५) घराविषयीचा राग यामधून प्रकट झाला आहे. एक प्रकारे हा बापाविषयीचा राग आहे. म्हणूनच तो हे घर सोडून काही तरी थोर केलं पाहिजे ह्या विचाराने पुण्याला येतो. पुण्यात आल्यानंतर तो कॉलेजच्या होस्टेलवर एका खोलीत राहतो. ही खोली म्हणजे जाणिवेच्या पातळीवरचे घरच आहे. ह्या घराच्या वर्णनात सामूहिक अचेतनाचा प्रदेश दिसून येतो. सांगवीकर म्हणतो, ''होस्टेलवर मी आलो, तेव्हा मला वरच्या मजल्यावर कोपऱ्यातली खोली मिळाली. ही खोली फार भयानक. हिच्यात दोन वर्षांपूर्वी एका मुलानं परीक्षेच्या आदल्या दिवशी पोटॅश खाऊन जीव दिला होता. शिवाय लाकडी खाट. म्हणून ढेकूण व्हायचे. शिवाय कोपऱ्यातली. म्हणून तिथे खारी, कबुतरं, उंदीर, मांजरी वगैरे यायचे. हे सगळं मला माहीत होतं. शिवाय इथून नळ-संडास सगळंच लांब. पण खोली पाह्यली, तेव्हा मला ती फार आवडली. दोन खिडक्या असूनदेखील भरपूर अंधार. एका खिडकीतून तर झाडाच्या फांद्यांना हात पोचायचा. दुसरीतून सुंदरपैकी टेकडी संबंध दिसायची. काळीभोर टेकडी. तिच्यावर अर्थातच निळं आकाश. खाली तुरळक झाडी.'' (कोसला-पृ. ९३) अशा प्रकारच्या वर्णनातून सामूहिक अचेतनाचा प्रदेश प्रकट होतो. वेगवेगळ्या प्रतिमांच्या माध्यमातून हा सामूहिक नेणिवेचा प्रदेश आविष्कृत झाला आहे. सांगवीकर आपले गावाकडचे घर सोडून ह्या ठिकाणी काही तरी थोर करण्यासाठी आला; परंतु येथेही त्याच्या हाती फार काही लागत नाही. ही खोलीही आपली नाही असे त्याला वाटते. त्याला एक प्रकारचा साक्षात्कार होतो. तो म्हणतो, ''चिरंतन आहे शेवटी जागाच''. (कोसला -पृ.१७४) खोली, ही आपली का नसावी; तिच्याविषयी त्याच्या मनात प्रेम आहे; परंतु ती त्याला मिळत नाही. स्वतःचे घर सोडून तो या ठिकाणी रमतो; परंतु एक दिवस हेही सोडून जावे लागणार. तो म्हणतो, ''ही जागा आपलीच आहे, ह्या हिशोबानं आपण वागतो. आणि आता हिला सोडून जा. काही कारण नसताना. जन्मभर इथे का राहता येऊ नये? करार संपतो ते का? ही लायब्ररी, ह्या आसपासच्या इमारती-तिकडच्या कॉलेजच्या इमारती-ह्या इमारतींच्यात चार वर्षं नाहीशी झाली. आपली वर्षं. अशी हजारो माणसांची लाखो वर्षं इमारती पिऊन टाकतात. आपल्याजवळ काहीच राहत नाही. आठवून-आठवून ह्या जागेवरच्या घटना मनात आणल्या, तरच ही जागा आपण पितो. ही झाडं, ह्या खोल्या, ह्या खिडक्या, ह्या टेकड्या, वेताळामागची कुरणं आणि तिथल्या गुंजा-सगळ्यांचा संबंध निव्वळ ही जागा सोडली की तुटला. संबंध जुळताना ते तुटतील, हे अगोदरपासून माहीत नसतं. ही जागा मात्र तुटू शकते. कारण आपले पाय जमिनीत रोवलेले नाहीत. म्हणून आपणच हा वर्षांचा आणि जागेचा संबंध जुळवून सांधतो. आपण पायांच्यावर हिंडतो आणि जुन्या जागेचा हिशेब ठेवतो. हे फार करुण आहे.'' (कोसला-पृ.१७४) ह्या वर्णनात आदिबंधात्मक ललित घटना दिसते. हे वर्णन अचेतनाचा प्रदेश आविष्कृत करते आहे. सांगवीकर चेतन आणि सामूहिक अचेतनाचा मेळ साधीत स्वात्मसाधनेचा प्रयत्न करत आहे; परंतु टेरीबल मदर (रुद्रमाता) त्याच्या वाटेत अनेक अडथळे निर्माण करते आहे. त्यामुळेच तो आदिम मातेशी एकरूप होताना अडचणींना सामोरा जात आहे. घर सोडून पुण्यात आलेला सांगवीकर येथेही वैतागतो, अनेक अडचणींचा सामना करतो. ह्या अचेतनाच्या मार्गात भेटलेल्या रमी, बुंदी ह्या अनिमाशी तो स्वतःला जोडून घेत नाही. त्यांना डावलून तो पुढे जातो.

सांगवीकरची लहान बहीण मनी पाच वर्षांची असताना मरते. तिच्या करुण मृत्यूमुळे तो मुळापासून हादरतो. आधीच घरावर चिडून असणारा सांगवीकर म्हणतो, ''मी वडलांचा खून करीन. मी आजीला ठार मारीन. मग मी सगळं घर पेटवून देईन. सगळ्यांची प्रेतं त्या घरात जाळून टाकीन, आईला जिवंत. हे असं मरणं.'' (कोसला-पृ.१२५) एक प्रकारे जाणिवेच्या पातळीवरील घराबद्दलचा द्वेष यामधून दिसून येतो; परंतु खरे तर सामूहिक नेणिवेतील टेरीबल मदरचे (रुद्रमाता) हे रूप आहे. ही माता त्याला त्रास देते आहे. कारण मातेपासून आपलं मूल दुरावणे हे तिला सहन होत नाही. जसे लौकिक जीवनात सांगवीकरच्या आईला तो दूर असल्यामुळे दुःख होते, तसेच सामूहिक अचेतनातील महामाता सांगवीकरला दूर जाण्यापासून रोखते आहे. त्याचा स्वात्मसाधनेचा प्रवास पूर्ण होऊ देत नाही. सांगवीकर मनीच्या मृत्यूबद्दल म्हणतो, ''तिच्या बरोबरच तिचं इवलंसं गर्भाशय गेलं. तिनं एक मोठ्ठीच खानेसुमारीची ओळ वाचली.'' (कोसला-पृ.१२९) येथे गर्भाशय हे

महामातेचे प्रतीक आहे. मनीच्या मृत्यूचे दुःख सांगवीकरला झाले आहे. म्हणूनच तो दुःख विसरण्यासाठी अजिंठा लेणी पाहायला जातो. ह्या ठिकाणी येणारी लेण्यांची वर्णने सामूहिक अचेतनाचा प्रदेश दर्शवतात. ''माझ्या समोरच्या एका गुहेत फक्त अंधार आहे. ही गुहा चालत-चालत हजारो मैल गेलो तरी संपणार नाही. अशी खोल, अंधारानं गुडूप भरलेली आहे. मी आत इकडेतिकडे हिंडतो, तर खरंच इथे काही नाही.'' (कोसला-पृ.१२८) ह्या सबंध वर्णनात आर्किटायपल सिच्युएशन तयार झाली आहे. गुहा ह्या प्रतिमेच्या माध्यमातून महामातेचा आदिबंध आविष्कृत होतो. मनीचं दुःख विसरण्यासाठी तो येथे आला आहे; परंतु तो येथे अधिकच गुरफटून गेला आहे. गुहा, अंधार, हजारो मैल असणारी गुहा, ही अंधारानं गुडुप भरलेली आहे. ह्या प्रतिमा सामूहिक अचेतनाला प्रकट करतात. ह्या सामूहिक अचेतनाच्या मार्गात असताना त्याला मार्ग दाखवणारा वाइज ओल्ड मॅन भेटत नाही. त्यामुळे तो त्रस्त झाला आहे. त्यामुळेच मनीच्या मृत्यूनंतर गावी बांधलेल्या घराविषयी त्याला प्रेम वाटत नाही. तो म्हणतो, ''आमचं नवं घर मला कायम एक भयानक वस्तू वाटत राह्यली. मनी मेल्यावर तिच्या मढ्यावर वडलांनी हे बांधलं. ह्याच्यात राहून राहून मला राहून राहून वाटलं की, जुनंच बरं होतं. जुन्या घरात अंधार होता. सगळीकडे दाट सामान होतं.'' (कोसला-पृ.१३०) ह्या नव्या घराविषयी सांगवीकरला प्रेम नाही. सांगवीकरचे वडील त्यांना हवे तसे नवे घर बांधतात. एक प्रकारे पुरुषप्रधान संस्कृतीचा येथे जय झाला आहे. सुरुवातीपासून सांगवीकर वडिलांचा द्वेष करतो आहे. त्यांच्या वागण्याला विरोध करतो आहे. एक प्रकारे आदिम पित्याशी त्याचा संघर्ष सुरू आहे. स्वात्मसाधना करताना नायकाला ज्याप्रमाणे मातेशी संघर्ष करावा लागतो, त्याप्रमाणे पित्याशीही संघर्ष करावा लागतो. या संघर्षात एकतर तो पित्याच्या दबावाखाली राहून पुढे येतो किंवा त्यांच्या विरोधाला न जुमानता स्वतंत्र वाट निर्माण करतो आणि आपला स्वात्मसाधनेचा प्रवास करतो. सांगवीकरचा हा संघर्ष शेवटी कमी होतो. म्हणून तो काही प्रमाणात वडिलांशी आणि घराशी जुळवून घेतो. तो म्हणतो, ''उदाहरणार्थ काही झालं तरी हे आपल्याला खुंट्यावर आणून वगैरे बांधतीलच. मग नेमकं अगोदरच खुंट्यावर येऊन उभं राह्यलेलं बरं.'' (कोसला-पृ.२६५)

कोसला कादंबरीतील घराची आदिप्रतिमा आपला प्रभाव गाजवत राहते. ह्या आदिम घराच्या प्रतिमेतून महामातेचा आदिबंध आविष्कृत झाला आहे. रुद्रमातेच्या स्वरूपात हा आदिबंध प्रकट झाला आहे. लौकिक आणि अलौकिक अशा दोन्ही पातळीवर घरासाठी सांगवीकरला संघर्ष करावा लागला आहे. त्याला पडलेल्या स्वप्नामधून विविध प्रतिमा-प्रतीके प्रकट झाली आहेत. ''कोसलामध्ये हिडीस उंदीर, मरून पडलेला ससा, जखम झालेली गाय, पळणारा घोडा, एकमेकांना रेटणारे रेडे, फोफावणं हे वैशिष्ट्य असणारी नागीण, प्रचंड हत्ती या प्राणी प्रतिमा येतात.''[३] त्याचप्रमाणे निवडुंग आणि इतर काही प्रतिमा येताना दिसतात. सांगवीकर आणि सुरेश ह्यांनी केलेल्या भटकंतीमधूनही अचेतनाचा प्रदेश प्रकट होतो. वेताळ टेकडी, सिंहगडवरील सहल, चतुःशृंगीचा डोंगर, नद्या ह्यांच्या वर्णनामधून सामूहिक अचेतनाचा प्रदेश प्रकट होतो. कोसलामधील माणूस-निसर्ग संबंधाबद्दल वासुदेव सावंत म्हणतात, ''मानवी वस्तीपासून दूर असलेल्या डोंगरदऱ्यातून रात्री-अपरात्री भटकण्याची पांडुरंगाची ओढ म्हणजे या भूमीशी आपलं नातं शोधण्याचाच प्रयत्न आहे. माणूस आणि निसर्ग यांची हरवलेली एकात्मता शोधण्याचा तो प्रयत्न आहे. झाडं पाय जमिनीत रोवून उभी असतात, त्यांचं खरं अस्तित्व जमिनीवरच असतं. माणसाला असं झाडाप्रमाणे जमिनीशी नातं जोडता येत नाही, ही जाणीव पांडुरंगाला व्यथित करते.''[४] टेकडीवर फिरायला गेल्यावर सांगवीकर म्हणतो, ''माणसाचं जमिनीत काय आहे? हे माणसानं पोटापायी घालवलं. ही पृथ्वी आम्हाला अंतर देणार नाही, असं तुला म्हणता येईल? वरून कुणीतरी आपल्याला सहज टाकून दिलं आहे. इथे भाड्यानं राहा म्हणून. हे शरीर भाड्यानं. शंभर वर्षांची पावती. काही गडबड केली, तर घर सोडावं लागेल. हे लक्षात आहे ना?'' (कोसला-पृ. १५९) तुमचं शरीर म्हणजे घर असा साक्षात्कार त्याला होतो. घराविषयी कितीतरी घटना कादंबरीत येतात. स्वप्नामधून, भटकंतीच्या घटनेमधून, वर्णनातून घराची आदिप्रतिमा सतत आवृत्त होत राहते. कादंबरीच्या शेवटी सांगवीकर गावात राहत असताना तिथल्या वेगवेगळ्या व्यक्तींच्या जीवनातील घराचे स्थानही हेच दर्शवते. उदा. गिरधर ही व्यक्तिरेखा. कोसलाच्या अवकाशाच्या संबंधाचे स्वरूप स्पष्ट करताना हरिश्चंद्र थोरात म्हणतात, ''बंदिस्त अवकाश विरुद्ध मुक्त आकाश या सूत्राचा फार मोठा प्रभाव 'कोसला'च्या रूपबंधावर आहे. कादंबरीच्या प्रारंभीच्या आणि शेवटच्या भागामध्ये खेडेगावचा अवकाश आला आहे. या अवकाशामध्ये 'घर'

हा बंदिस्त अवकाश आहे. घराचा बंदिस्तपणा केवळ भौतिक पातळीवरचा नाही. पुरुषप्रधान कुटुंबव्यवस्थेच्या पूर्ण नियंत्रणाखाली असलेला हा अवकाश आहे. तेथे सृजनशीलतेला वाव नाही. तो सशाला ठेवण्यासाठी वापरला जाणारा उंदराचा पिंजरा आहे. खास खेडेगावची संस्कृती त्यात नांदत आहे. या अर्थाने गावाच्या अवकाशाचे घरावर प्रभुत्व आहे. तर घर हा खेड्याचा अविभाज्य भाग आहे. घरासहचा हा गावाचा अवकाश शहराच्या कालावकाशाशी विरोध संबंधाने जोडला गेला आहे.''[९]

'घर' ह्या आदिप्रतिमेप्रमाणेच आणखी एका आदिबंधाच्या साहाय्याने कोसलाचे आशयविश्व उलगडता येऊ शकते, त्याचा थोडक्यात येथे उल्लेख करणे गरजेचे आहे. ह्या कादंबरीत परात्मतेची जाणीव तीव्र स्वरूपात प्रकट झाली आहे. ''या प्रेरणेनेच या कादंबऱ्यातील कथानक, व्यक्तिचरित्र, निवेदनशैली व भाषा ही प्रभावित झालेली आहेत. हे सारे लक्षात घेता या कादंबऱ्यांत परात्मतेच्या जाणिवेचा एक नवाच आदिबंध (आर्किटाइप) प्रतिनायकाच्या 'मिथ'मधून मूर्त झालेला दिसतो. या दृष्टीने या कादंबऱ्यांनी प्रतिनायकाची एक नवी 'मिथ' मराठी कादंबरीच्या इतिहासात निर्माण केली आहे. परात्मतेच्या जाणिवेची आणि प्रतिनायकाची एक नवीन 'मिथ' निर्माण करणारी 'कोसला' ही मराठी साहित्यातील पहिली कादंबरी होय.''[१०] कोसला कादंबरीत वीरनायकाची जागा प्रतिनायकाने घेतली आहे. ह्यामधून विदूषकाचा आदिबंध प्रकट होतो. ''युंगने विदूषक (trickster figure ) हा एक आदिबंध मानलेला आहे. ती अनुभवाची एक सर्वांत आदिम मूस होय. पशूचा मानव होऊ लागलेला आहे पण पाशवी पातळी अजून सुटलेली नाही, स्व व स्वेतर असा भेदभाव फारसा निर्माण झालेला नाही अशी ही अवस्था आहे.''[११] नवकादंबरीत नायकाची जागा विदूषकाने, प्रतिनायकाने (Negative hero) घेतलेली आहे. पांडुरंग सांगवीकर हा प्रतिनायक आहे. त्यामुळेच ''भालचंद्र नेमाडे यांच्या 'कोसला' कादंबरीची मूसही विदूषकाची आहे.''[१२] असे मत भरतसिंग पाटील यांनी नोंदवलेले आहे.

सारांश, कोसला ह्या बहुआयामी कादंबरीचा वेगवेगळ्या पद्धतीने विचार करता येऊ शकतो. प्रस्तुत ठिकाणी घराची आदिप्रतिमा शोधली आहे. संपूर्ण कादंबरीवर ह्या आदिप्रतिमेचा प्रभाव आहे. ह्या कादंबरीतील गूढ, अंतर्विरोधात्मक चित्रणामुळे व्यामिश्र जीवनानुभव प्रकट होतात. म्हणूनच ही युंगच्या साक्षात्कारी कलाप्रकारात मोडणारी साहित्यकृती आहे.

**संदर्भ आणि टिपा -**


१. इनामदार-साने रेखा, 'अस्तित्ववाद आणि मराठी कादंबरी', राजहंस प्रकाशन, पुणे, पहिली आवृत्ती : सप्टेंबर २००४, पृ. १४३
२. सप्रे अविनाश, 'कोसलातील जीवनदर्शन', अंतर्भूत : बाबा भांड (संपा.), 'कोसलाबद्दल', साकेत प्रकाशन, औरंगाबाद, दुसरी आवृत्ती : १९९६ (प्र.आ.:ऑक्टो. १९७९), पृ. ८५
३. पाटील शरद, 'कोसला : भारतीय परात्मतेचा परमोत्कर्ष', अंतर्भूत : बाबा भांड (संपा.), 'कोसलाबद्दल', उनि., पृ. १८६
४. पाटील गंगाधर, 'आदिमातेचा पुत्र : २', सत्यकथा, वर्ष चव्वेचाळिसावे, अंक नववा, जुलै १९७७, पृ. ३८
५. तत्रैव, पृ. ३९
६. पाटील म.सु., 'आदिबंधात्मक समीक्षा', नीहारा प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ती : सप्टेंबर १९८९, पृ. ८१
७. नाईक शोभा, 'भारतीय संदर्भातून स्त्रीवाद', लोकवाङ्मय गृह, मुंबई, पहिली आवृत्ती : जून २००७, पृ. २३०
८. सावंत वासुदेव, 'भालचंद्र नेमाडे यांच्या कोसला कादंबरीचा अभ्यास', अंतर्भूत : बाबा भांड (संपा.), 'कोसलाबद्दल', उनि., पृ. २४६
९. थोरात हरिश्चंद्र, 'गेल्या पन्नास वर्षांतील मराठी कादंबरीचा आकृतिबंध', अंतर्भूत : विलास खोले (संपा.), 'गेल्या अर्धशतकातील मराठी कादंबरी', लोकवाङ्मय गृह, मुंबई, तिसरी आवृत्ती : फेब्रुवारी २०११ (प्र.आ.: ऑगस्ट २००२), पृ. ८२
१०. पाटील गंगाधर, 'समीक्षेची नवी रूपे', मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, दुसरी आवृत्ती : जुलै २००१ (प्र.आ.: जानेवारी १९८१), पृ. १००
११. पाटील म. सु., उनि., पृ. ९४
१२. पाटील भरतसिंग, 'देखणी : स्वात्मसाधनेचा प्रवास', नव अनुष्टुभ, मे-जून-जुलै-ऑगस्ट २०१६, वर्ष अकरावे, अंक तिसरा-चौथा, पृ. ३४


**आधारभूत ग्रंथ :**


- नेमाडे भालचंद्र, 'कोसला', पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, आठवे पुनर्मुद्रण : २०१३ (प्र. आ.: १९६३)


■


उमेश मारुती सिरसट
मराठी विभाग,
सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे
चलभाष : ९६५७१५९५१५०



लेख

निरूपमा जोशी

# जर्मन महाकाव्य 'द नीबेलूंगेनलीड': एक दृष्टिक्षेप



जागतिक साहित्याच्या परंपरेत महत्वाचं स्थान असलेला काव्यप्रकार म्हणजे महाकाव्य. इंग्लिशमध्ये 'एपिक' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या या साहित्यप्रकाराविषयी ॲरिस्टॉस्टलने 'काव्यशास्त्र' (पोएटिक) या आपल्या ग्रंथात चर्चा केली आहे. पाश्चात्त्य महाकाव्यांमधील बॅबिलोनियन संस्कृतीतले 'गिल्गामेश', 'एनिस' हे रोमन महाकाव्य, 'इलियाड' व 'ओडेसी' ही ग्रीक महाकाव्ये, 'चेन्स द रोलँ' हे फ्रेंच महाकाव्य अशी इ.स. पूर्व ते मध्ययुगीन कालखंडापर्यंतची काही उल्लेखनीय महाकाव्ये सांगता येतात. दीर्घ लांबी आणि पात्रांची मोठी संख्या असलेले, त्याचबरोबर मिथके, ऐतिहासिक पात्रे, घटना, दंतकथा या सर्वांचा आधार घेत निर्माण झालेले पद्यातील काव्य म्हणजे महाकाव्य अर्थात एपिक असे पाश्चात्त्य महाकाव्यांबाबत ढोबळपणे म्हणता येईल. महाकाव्यांना ऐतिहासिक पात्रे व घटना यांचा संदर्भ असला तरी इतिहास व महाकाव्य या दोन वेगळ्या गोष्टी आहेत. हे ॲरिस्टॉटल आपल्या 'काव्यशास्त्रात' स्पष्ट करतो. कवी आणि इतिहासकार यांच्यातील भेदही तो उलगडून दाखवतो.

''कवीचे कार्य जे घडले आहे ते सांगणे हे नव्हे तर जे घडू शकेल- संभाव्यतेच्या किंवा अपरिहार्यतेच्या नियमाप्रमाणे जे शक्य आहे ते सांगणे हे आहे. कवी व इतिहासकार ह्यांच्यामध्ये भिन्नता आहे, ती पद्यामध्ये अगर गद्यामध्ये लिहिण्यामुळे नव्हे. खरा भेद हा आहे की, एक जे घडले ते सांगतो, तर दुसरा जे घडणे संभाव्य आहे ते सांगतो. म्हणून काव्य ही गोष्ट इतिहासापेक्षा अधिक तत्त्वज्ञानात्मक व अधिक उच्च आहे; कारण काव्याची प्रकृती विश्वात्मकाचा आविष्कार करण्याकडे तर इतिहासाची प्रवृत्ती विवक्षिताचा आविष्कार करण्याकडे असते.''[१] इतिहास आणि काव्य यांच्यातील सीमारेषा ओळखण्यासाठी ॲरिस्टॉटलचे हे स्पष्टीकरण निश्चितच उपयोगी पडते. याविषयी इतकी सविस्तर चर्चा करण्याचे कारण म्हणजे ज्या जर्मन महाकाव्याचा आपण पुढे परिचय करून घेणार आहोत, ते 'द नीबेलूंगेनलीड' हे महाकाव्य असेच इतिहास आणि कवीची प्रतिभा यांची बेमालूम सरमिसळ होऊन निर्माण झालेले महाकाव्य आहे.

**द नीबेलूंगेनलीड :**

जर्मन साहित्यात 'राष्ट्रीय महाकाव्य' म्हणून उल्लेख होण्याएवढे महत्त्वाचे स्थान 'द नीबेलूंगेनलीड' या महाकाव्याने पटकावले आहे. अर्थात, इथे स्पष्ट करणे गरजेचे आहे की, भारतात ज्या अर्थाने रामायण, महाभारत या काव्यांना राष्ट्रीय महाकाव्ये म्हणून संबोधण्यात येते, त्या अर्थाने 'नीबेलूंगेनलीड' हे राष्ट्रीय महाकाव्य नाही. जर्मन जनतेच्या भावविश्वाचा ते भाग बनलेले नाही. मात्र, जर्मन साहित्यातील एक अतिशय महत्त्वपूर्ण महाकाव्य, ज्यात जर्मन समाजातील दंतकथा, ऐतिहासिक घटना व पात्रे यांचे प्रतिबिंब पडलेले आहे आणि सध्या जरी ते फारसे प्रचलित नसले, तरी एकेकाळी त्याने जर्मन समाजमनावर प्रभाव गाजवला असून आजही ते पूर्णपणे विस्मृतीत गेलेले नाही, अशा मर्यादित अर्थानेच त्याला 'राष्ट्रीय महाकाव्य' म्हणता येते. इ.स.च्या तेराव्या शतकात अधिक नेमकेपणे सांगायचे तर इ. स. ११९० ते इ. स. १२४० दरम्यानच्या कालावधीत या महाकाव्याची रचना झाली. सहाव्या-सातव्या शतकांतील जर्मनीतील काही ऐतिहासिक घटना, मौखिक परंपरेतून चालत आलेल्या काही दंतकथा व स्कँडेनेव्हिअन मिथक कथा या सर्वांवर आधारित असे हे मध्ययुगातील महाकाव्य आहे. साहजिकच त्याच्या रचनेवर, विषयाच्या हाताळणीवर मध्ययुगाचा, त्या काळातील सामंतशाहीचा प्रभाव दिसून येतो. निर्मितीनंतरच्या काळात हे महाकाव्य बरेच प्रसिद्ध असावे, असे अनुमान त्याच्या हस्तलिखितांच्या संख्येवरून काढता येते. परंतु पुढे मध्ययुगीन सामंतशाहीचा अस्त झाल्यानंतर ते काहीसे विस्मृतीत गेले. अठराव्या शतकात पुन्हा एकदा दंतकथा, ऐतिहासिक कथांविषयी लोकांमध्ये उत्सुकता निर्माण झाली. साधारण त्याच सुमारास हे काव्य प्रकाशझोतात आले. इ. स. १७५५-५६मध्ये नीबेलूंगेनलीडची तीन हस्तलिखिते सापडली. या हस्तलिखितांच्या ओळींच्या आणि कडव्यांच्या संख्येत थोडी तफावत आढळते. त्यांचा काळ निश्चित करता आलेला नाही. ह्या हस्तलिखितांना 'ए', 'बी' व 'सी' अशा संज्ञा देण्यात आल्या असून सध्या ही हस्तलिखिते ज्या ठिकाणी जतन करून ठेवलेली आहेत, त्या ठिकाणावरून त्यांना ओळखले जाते. नीबेलूंगेनलीडचा कर्ता अज्ञात आहे. मात्र काव्यातील अंतर्गत



अनुक्रमणिका

संदर्भ, पुरावे जसे की श्लोकरचना, शब्दांची निवड, छंद, शैली इत्यादीवरून ही रचना एकाच कवीची असावी, असे मानण्यात येते. महाकाव्यातील भाषेवरून तसेच वर्णनांवरून याची रचना दक्षिण जर्मनीच्या, ऑस्ट्रियाजवळच्या भागात झालेली असावी, असे संशोधक मानतात. मौखिक परंपरेने कवीपर्यंत चालत आलेल्या कथानकांची, मिथकांची त्याने आपल्या प्रतिभेच्या बळावर सुसंघटित लिखित स्वरूपात मांडणी करून हे काव्य रचले. ज्या काळात ते रचले गेले, त्या मध्ययुगीन काळाचे, तेव्हाच्या राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक परिस्थितीचे प्रतिबिंब या काव्यात पडलेले दिसते. म्हणूनच जर्मन परंपरेचा धागा असण्याबरोबरच मध्ययुगीन काळातील एक प्रभावी स्वतंत्र साहित्यकृती अशी 'नीबेलूंगेनलीड'ची ओळख निर्माण झाली आहे.

**रचना व आशय :**

'नीबेलूंगेनलीड' हे साडेनऊ हजार ओळींचे महाकाव्य आहे. त्यात ३९ 'प्रकरणे' आहेत. प्रत्येक प्रकरणातील श्लोकसंख्या वेगळी आहे. प्रत्येक प्रकरणाला शीर्षक असून कथानकातील विवक्षित भागाचा निर्देश या शीर्षकातून होतो. हे महाकाव्य मध्ययुगीन जर्मन भाषेत रचले गेले आहे. सध्याच्या प्रचलित जर्मन भाषेमध्ये त्याची श्लोकबद्ध समांतर भाषांतरे उपलब्ध आहेत. आशयाच्या दृष्टीने या महाकाव्याचे दोन भाग पडतात. हे दोन्ही भाग परस्परांशी संलग्न आहेत. पहिल्या एक ते एकोणीस प्रकरणांमधील कथानकाच्या परिणामस्वरूप पुढील वीस ते एकोणचाळीस प्रकरणे आहेत. या महाकाव्यातील कथेचा केंद्रबिंदू आहे. सर्वसंहारक युद्ध, झालेली फसवणूक, अपमान यांचा बदला घेण्याच्या हेतूने घडवून आणलेल्या युद्धाचे महाकाव्याला साजेसे रोमांचक व विस्तृत वर्णन यात आहे. एका अर्थी ही सूडकथाच आहे. अत्यंत सशक्त आणि मध्यवर्ती स्त्री व्यक्तिरेखा हे या महाकाव्याचे वैशिष्ट्य सांगता येईल. मध्ययुगीन काळाच्या पार्श्वभूमीवर तर ही बाब विशेष उल्लेखनीय आहे. पूर्णतया नायिकाप्रधान असे हे महाकाव्य नसले तरी कथेला विवक्षित वळण देण्यात या महाकाव्यातील स्त्री व्यक्तिरेखाच कारणीभूत ठरल्या आहेत. नीतिमूल्यांविषयीच्या विशिष्ट धारणा या महाकाव्यातून प्रकट होत असल्या तरी यात कोणत्याही प्रकारच्या तत्त्वज्ञानात्मक, नैतिक शिकवणुकीचा अभाव आहे. एका कथासूत्राचा साधारण एकरेषीय प्रवास असे या महाकाव्याचे स्वरूप असल्यामुळे आनुषंगिक कथानके, उपकथानके तुलनेने कमी आहेत.

**नीबेलूंगेनलीडची लोकप्रियता :**

नीबेलूंगेनलीड या महाकाव्याने आपल्या निर्मितीनंतरच्या काळात अनेक नव्या साहित्यकृतींना, कलाकृतींना प्रेरणा दिली आहे. अनेक चित्रांमधून, शिल्पांमधून या महाकाव्यातील प्रसंगांचे चित्रण झाले आहे. फ्रीडरिश हेबेल याचे 'नीबेलूंगेन' हे नाटक, रिचर्ड वॅग्नर या जगप्रसिद्ध संगीतकाराची 'द रिंग ऑफ नीबेलूंगेन' ही सांगीतिका (ऑपेरा) ह्या या महाकाव्याच्या आधारे निर्माण झालेल्या एकोणिसाव्या शतकातील दखल घेण्याजोग्या कलाकृती आहेत. १९२४मध्ये तयार झालेला फ्रीट्झ लांग यांचा 'द नीबेलूंगेन' हा चित्रपट, सन २००४मध्ये उली एडेल यांनी बनवलेला जर्मन भाषेमधला 'दी नीबेलूंगेन', इंग्लिशमधले 'रिंग ऑफ द नीबेलूंगेन' व 'द डार्क किंगडम : द ड्रॅगन किंग' या चित्रपटांमधून या महाकाव्याची लोकप्रियता अजूनही अबाधित आहे. हीच बाब निदर्शनास येते. विविध माध्यमांतील सर्जनशील अभिव्यक्तीला प्रेरक ठरण्याबरोबरच साहित्य आणि संस्कृती संशोधकांच्या अभ्यासातही या महाकाव्याने महत्त्वाचे स्थान मिळविले आहे. पहिल्या आणि विशेषकरून दुसऱ्या महायुद्धात हे महाकाव्य जर्मन अस्मितेचे प्रतीक म्हणून वापरले गेले. त्यातील काही पात्रांना, मूल्यांना जर्मन समाजाचे आदर्श मानण्यात आले. या महाकाव्यावर आधारित कलाकृती (उदा. वॅग्नरचे 'द रिंग ऑफ नीबेलूंगेन') अत्यंत लोकप्रिय ठरल्या. शालेय, महाविद्यालयीन अभ्यासक्रमात या काव्याचा समावेश होण्याएवढी त्याच्या लोकप्रियतेची व्याप्ती वाढली. मात्र, दुसऱ्या महायुद्धाच्या समाप्तीनंतर नाझी काळाशी जोडल्या गेलेल्या सर्व गोष्टींविषयी एक प्रकारचा तिटकारा किंवा त्यापासून दूर जाण्याची वृत्ती जर्मन जनमानसांत प्रभावी झाली. परिणामस्वरूप नाझी काळात काही विशिष्ट उद्देशाने वापरल्या गेलेल्या ह्या महाकाव्यालाही रोषाचे बळी व्हावे लागले. कालांतराने या भूमिकेत हळूहळू बदल होत गेला व आता पुन्हा मध्ययुगीन जर्मन साहित्याच्या अभ्यासात ह्या महाकाव्याला एक निश्चित स्थान मिळाले आहे. असे असले तरीसुद्धा सर्वसामान्य जर्मन जनता, विशेषतः तरुण पिढी ह्या महाकाव्याविषयी बऱ्यापैकी अनभिज्ञ असल्याचे आजचे चित्र आहे.

'नीबेलूंगेनलीड' या महाकाव्यातील ऐतिहासिकतेचा शोध, त्यातील मिथक कथांचा शोध, मध्ययुगीन काळाचे प्रतिनिधित्व करणारी एक मध्ययुगीन साहित्यकृती या दृष्टिकोनातून केला जाणारा अभ्यास, निर्मितीपासून आजपर्यंत पडलेला ह्या महाकाव्याच्या प्रभावाचा अभ्यास अशा विविध अंगांनी नीबेलूंगेनलीडची चिकित्सा होते आहे. काळानुरूप बदलत गेलेले या काव्याचे सांस्कृतिक संदर्भ अभ्यासण्याजोगे आहेत. एखाद्या व्यक्तीच्या जीवनातील चढ-उतारांसारखेच एखाद्या महाकाव्याच्या लोकप्रियतेत झालेले चढउतार हा 'नीबेलूंगेनलीड'च्या बाबतीत अभ्यासाचा एक स्वतंत्र विषय ठरला आहे. त्यातूनच या महाकाव्याचे राजकीय-सामाजिक-सांस्कृतिक व साहित्यिक पटलांवरचे महत्त्व आणि सार्वकालिकत्व अधोरेखित झाले आहे.

संदर्भ : १. करंदीकर गो. वि., 'ॲरिस्टॉटलचे काव्यशास्त्र', दुसरी आवृत्ती, मौज प्रकाशन, मुंबई १९७८, पृ. ७१.

■ निरूपमा जोशी
चलभाष : ९८९०१०४८५९
इ-मेल : nirjos@yahoo.com



पुस्तक परीक्षण

**श्रीनिवास जनार्दन मोडक**

### भारतीय पुराणांचे प्राचीनत्व :

# शास्त्रीय-वैज्ञानिक कसोट्यांवर सिद्ध करणारा तार्किक बुद्धिवाद



आशियायी व युरोपीय संस्कृतींचा प्राचीनत्वाचा वाद; वैदिक संस्कृतीचा उद्‌गम कुठे व विस्तार कसा झाला, या मुद्द्यांवर वेतण्याचे काम ग्रीक, रोमन श्वेतवर्णीयांच्या वारसांनी त्यांच्या दर्पावर्दीपणाच्या ताकदीवर वस्तान वसविलेल्या व पादाक्रांत केलेल्या आशियायी देश व संस्कृतींबावत केले असल्याने आशियायी संस्कृतीचे, धर्मांचे, विचारांचे मूलस्रोत पुरातत्त्वीय, भाषाशास्त्रीय, ग्रांथिक व समाजशास्त्रीय प्रमाणांनी अर्वाचीन दाखविण्याकडे अभ्यासकांचा कल दिसतो. भारताचा इतिहास, विशेषतः पुराणे व स्मृती यांत आढळणारा चार युगांचा इतिहास यांचा काळ ठरवताना, निव्वळ पुरातत्त्व व सामाजिक परंपरा अपुऱ्या पडतात. बुद्धी व तर्क वापरून यांचे परीक्षण केल्यास पश्चिमी व देशी विद्वानांचे काळविषयक निष्कर्ष संशयास्पद वाटू लागतात. रामायण व महाभारत या भारतीय संस्कृतीच्या इतिहास ग्रंथांवावत प्रचंड घोळ व मतभेद अभ्यासकांच्या लिखाणांत आढळतात. प्रत्यक्ष प्रमाण या सर्वांवरील उतारा आहे.

आकाशस्थ स्थिर (तौलनिक) तारे व ग्रहांची सूर्याभोवती भ्रमणे व परस्पर संदर्भांत स्थिती, तारा ग्रह युती, पृथ्वीचे स्वतःभोवती व सूर्याभोवती भ्रमण, सूर्य, चंद्र ग्रहणे, ऋतुचक्र (भारतीय उपखंडांतील) या सर्वांच्या गणितावद्दल एकवाक्यता असल्याने, रामायण व महाभारतातील खगोलीय उल्लेखांना घेऊन नासा, स्कायमॅपप्रो, स्विटेस्ट या कॉम्प्युटर अॅस्ट्रॉनॉमी प्रोग्राम्स प्रमाणे पृथ्वीची गती १०० वर्षांत १.७ मिलिसेकंद वाढत असल्याचे वास्तवाचे भान ठेवून रामायणासाठी २३ क ३० मि व महाभारतासाठी १२ क २४ मि 'डेल्डा टी' घेऊन विविध खगोलीय घटनांच्या ग्रंथोक्त उल्लेखांचा मागोवा घेऊन लेखकांनी कालनिर्णय; सर्व वचने व तांत्रिक बाबी नमूद करून केला आहे. त्यामुळे तो पूर्वीच्या सर्व अभ्यासकांपेक्षा वास्तवाच्या अधिक जवळ जाणारा आहे. रामजन्म १ जानेवारी इसवी सर्व पूर्व ५,६४८ ग्रेगरियन व महाभारत युद्ध ७ सप्टेंबर इसवी सन पूर्व ३,००८ ग्रेगरियन असा दिला आहे. सर्व ठळक घटनांची कालदर्शक कोष्टके लेखकांनी दिली आहेत. प्रसंगी संस्कृतचा अर्थ करण्यात खगोल गणिताच्या अज्ञानामुळे विद्वानांची झालेली गफलतही दाखवली आहे. उदा. महाभारत उद्योगपर्व १४३।९ - कृत्वा चाङगरको वक्रं ज्येष्ठायां मधुसूदन। अनुराधां प्रार्थयते मैत्र संठामयन्निव।। रामायण व महाभारत काळी तिथी नक्षत्रावरून मोजून घेण्याची पद्धत होती. तेव्हा आजच्याप्रमाणे १२ अंश अंतर चंद्र रवीत झाल्यावर एक तिथी मोजली जात नव्हती, हा लेखकाने दिलेला महत्त्वाचा भाग आहे. त्यामुळे महाभारतीय युद्धकाळ व भीष्मनिर्याण बरोबर जुळते.

लेखकाने 'युगगणना' या विषयावर दिलेला विचार रामायणावरील ग्रंथात प्रथम प्रकरणात आहे. हे लेखकाचे महत्त्वाचे योगदान आहे. त्यामुळे पुराणे या कविकल्पना नसून इतिहास असल्याचे स्पष्ट होते. जनमेजयप्रदत्त ताम्रशासनाच्या काळाचा महाभारतावरील ग्रंथांत केलेला उल्लेख व उकल अचूक आहे. पं. गणपतिशास्त्री हेब्बार यांच्या 'भारतीय लिपींचे मौलिक एकरूप' या ग्रंथांत या ताम्रशासनाचा व कालनिर्णयाचा उल्लेख आला आहे. तथापि चतुर्युगांच्या वर्षांचे त्यांना आकलन झाल्याचे स्पष्ट नाही.

'महाभारताचा कालनिर्णय' व 'रामायणाचा खगोलशास्त्रीय शोध' ही इंजिनियर प्रफुल्ल वामन मेंडकी यांची दोन्ही पुस्तके प्रत्येक खगोलशास्त्र, धर्मशास्त्र, इतिहास अभ्यासक, भारतीय संस्कृतीचे अभ्यासक यांनी आवर्जून संग्रहात ठेवण्याजोगी आहेत. ही दोन्ही पुस्तके युगप्रवर्तक व सन्मानपात्र आहेत. पुण्याच्या पुष्पक प्रकाशनाने अशा दुर्मीळ संशोधनाचे सांप्रतच्या बाजारू काळात प्रकाशन केल्याचा गौरव या संशोधक लेखकासोबत करावा तितका कमीच पडेल.




**प्रकाशन - पुष्पक प्रकाशन,**
**३८।आ।१, शनिवार पेठ**
**पुणे- ४११०३०**
**फोन नं. ०२०- २४४८३०६२**

**श्रीनिवास जनार्दन मोडक**
फ्लॅट नं. ५१, एरंडवणा गावठाण,
पुणे ४११०३८



अनुक्रमणिका








पुस्तक परीक्षण

कल्याणी हर्डीकर

# आस्वाद : 'मौनाच्या भाषांतरां'चा...



**आकलन-आस्वाद-विवरण आणि चिकित्सा यातूनच कवी कोणत्याही अनुभवाची प्रतीती घेत असतो. कवीच्या अंतःकरणातली सहजस्फुरणे, इच्छाशक्ती, बुद्धी आणि भावना त्याच्या नवनिर्माणाच्या पाठीशी असतात. त्याची ही निर्मिती म्हणजे त्याच्या व्यक्तिगत सम्यक ईक्षणाचेच फल असते. कवी स्वतःच जीवनाची समीक्षा करत असतो आणि जीवनाची बिंबे-प्रतिबिंबे आस्वादकाला दाखवत असतो. संदीप खरे यांनी 'मौनाची अक्षरे'मधून अत्यंत समर्थपणाने ही जीवनसमीक्षा प्रतिबिंबित केली आहे.**





कविता म्हणजे कमाल अर्थवत्तेने भारलेली भाषा...

माझ्या समोर 'मौनाची भाषांतरे', 'नेणिवेची अक्षरे' आणि 'तुझ्यावरच्या कविता' अशा एकूण तीन कवितासंग्रहांतील एकशे ब्याण्णव कविता आहेत. अर्थातच यांचा कवी आहे संदीप खरे. मी आस्वाद घेणार आहे त्यांच्या पहिल्या कवितासंग्रहातील काव्याचा... 'मौनाची भाषांतरे'चा. तरुणांपासून ज्येष्ठांपर्यंत आणि रसिकापासून समीक्षकांपर्यंत सगळ्यांनाच डोलवणारी ही कविता आहे. खरे यांच्या कवितेची अनेक वैशिष्ट्ये आहेत. त्यातले महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे ते उत्तम 'सादरकर्ते' आहेत. स्वतःचेच संगीत, स्वतःचेच गाणे. यामुळे त्यांनी रंगमंचीय अनेक कार्यक्रमांमधून प्रचंड लोकप्रियता, प्रसिद्धी मिळविली आहे. आणि काव्यसादरीकरणाची एक 'खरे'शैली निर्माण केली आहे. आपण त्याला 'संदीपशैली' म्हणू शकतो. हा कवी उत्तम गीतकारही आहे. अनेक मराठी चित्रपटांसाठी त्यांनी गीतलेखन केले आहे. वाहिन्यांवरील मालिकांसाठी शीर्षकगीतलेखनही त्यांच्या गाठी आहे. व्यवसायाने जाहिरात क्षेत्रात वावरणारे, तिथेही स्वतःची नामुद्रा उठवत त्या क्षेत्रातले पुरस्कार पटकवत, 'कॉपीरायटर' म्हणून व्यवसायात स्थिरावलेले आहेत. जाहिरात क्षेत्रात आणि झगमगत्या रंगमंचीय दुनियेत राहूनही त्यांची कविता मात्र कधीच मला 'मागणी तसा पुरवठा' प्रकारातील वाटली नाही. किंबहुना रंगमंचीय कार्यक्रमाच्या वेळीही ती इतर कवींबरोबर ऐकत असताना खूप वेगळी, अर्थवाही शब्दांची वाटली. थबकून पुन्हा एकदा त्या कवितांची अर्थवाहकता, भावगर्भता अनुभवावी, असे जाणवले. म्हणून हा प्रपंच. आस्वादाचा.

'शब्द.' शब्द माणसाच्या व्यक्तिमत्त्वाचा आधारवड असतात. शब्द वस्तूचा, संकल्पनेचा, तर्काचा, भावनेचा आणि चिंतिताचा 'संकेत' म्हणून येतात. समक्ष नसलेल्या रूपाला शब्दसंकेताने साहित्यरूप मिळते. आणि मग ते आपल्याला कुठून कुठे घेऊन जाते. संदीप खरे यांच्या पहिल्या कवितासंग्रहातली -'मौनाची भाषांतरे'तील ही कविता...

*कसे सरतील सये माझ्याविना दिस तुझे?*
*सरताना आणि सांग सलतील ना!*
*गुलाबाची फुलं दोन रोज राती डोळ्यांवर*
*मुसुमुसू पाणी सांग भरतील ना?*

'कॅलिडोस्कोप' कार्यक्रमात अतिशय लोकप्रिय झालेली कविता ऐकता ऐकता मी चमकले होते. पंचपदी असलेली ही कविता, मीलन-विरहाची कविता










आहे. खरे ती गातातही उत्तम. छंदोबद्ध असल्यामुळे तिची लय, नादमयताही छान. तिचा आस्वाद घेताना शब्दार्थांची प्रतिमा, त्या प्रतिमांचे विस्मयचकित करणारे स्वरूप माझे मलाच चकित करत होते. कसे, तर या कडव्यात खरे यांनी एका जीवशास्त्रीय भावनेचे आणि अनुभवाचे प्रकटीकरण केले आहे. वाच्यार्थाने, कवितेत कवी आपल्या प्रेयसीला 'तू माझ्या आठवणीने व्याकूळ होशील ना?' एवढेच विचारतोय असे वाटले; पण प्रत्यक्षात मात्र संपूर्ण तृप्त परिपूर्ण सफल प्रणयपूर्तीचा क्षण आणि त्याची आठवण; हा तृप्त परिपूर्ण शृंगारक्षण पुन्हा काही दिवस नाही, याची सल; सल म्हणजे टोचणे, बोचणे. प्रणयक्रीडेत टोचणाऱ्या, बोचणाऱ्या कितीतरी गोष्टी... सरणारे क्षण आणि दिवसही... अंगसंगाच्या आठवणींचाही सलच की, तो संग आत्ता नाही. 'गुलाबाची फुलं' ती दोनच आहेत. लालचुटूक ओठदले. दोघांची. डोळ्यांवर.. आणि अथांग तृप्तीचेही डोळाभरले पाणी... मुसमुसणाऱ्या सौंदर्यवतीचे... मुसमुसणारे पाणी!! पाणी, धारा, संतत झड आणि झुरझुरणारा घन... गुलाबाच्या फुलांप्रमाणेच पाण्याची प्रतिमाही कवितेभर फिरत राहते आणि अर्थसमृद्धी करत जाते.



संदीप खरे यांचे वैशिष्ट्य हेच आहे की, ते इथे फक्त अनुभवाचे निवेदन करत नाहीत, तर अनुभवाची निर्मिती करतात. आणि ही अनुभवनिर्मिती ते आशयघन शब्दांमधून करतात. व्यवहारातलाच हा जैविक अनुभव 'प्रेम' त्यातल्या शब्दलाघवामुळे जसा चैतन्यदायी ठरतो, तसाच काव्यानुभवामुळे अनुभवसमृद्ध होतो.

*ती उन्हे रेशमी होती, चांदणे धगीचे होते*
*कवितेच्या शेतामधले ते दिवस सुगीचे होते*
*संकेतस्थळांचे सूर त्या लालस ओठी होते*
*ती वेळ पूरिया होती अन् झाड मारवा होते.*

विप्रलंभ शृंगाराच्या अनेक कळा संदीप खरे यांच्या 'सरीवर सरी', 'सारखं सारखं पाणी', 'चांदणं' या कवितांमधूनही अनुभवण्यासारख्या आहेत. पण अशा कविता एकूणच संख्येने कमी आहेत.

'मौनाची भाषांतरे'च्या सन २००५ पासून २०१७ पर्यंत एकूण नऊ आवृत्त्या झाल्या आहेत. यात ७८ कविता आहेत. हा त्यांचा पहिलाच काव्यसंग्रह. अगदी अर्पणपत्रिकेपासूनच वेगळा. सगळ्यांना धरून ठेवून, भावनिक जवळीक साधतही स्वतःचा एकांत जपणारा हा कवी जसा शीर्षकातून दिसतो, तसाच तो अर्पणपत्रिकेतूनही लोभावणारा. पहिल्याच पानावरच्या कविता. मुडपलेली, त्रिकोणातली पाने. त्रिकोणातली चित्रे. हे सारे त्यांच्या भावकोवळीकतेवर भाष्य करायला पुरेसे ठरतात. पण खऱ्यांच्या कवितेवरून खऱ्यांच्या काव्यव्यक्तिमत्त्वावर भाष्य करताना खूपदा चकव्यांना सामोरे जावे लागते म्हणजे पाहा...

*असेन्ही जरी मी सर्वांनी सोडलेला!*
*असेनही जरी सांप्रतकाळी मोडलेला*
*परंतु इतुके निश्चित मजला ठाव की*
*मी इथला-पण नक्षत्रांशी जोडलेला!!*

'मी' कसा? तर सगळ्यांनी मिळून सोडलेला. आशा सोडलेली, कुचकामी, देवाला सोडतात पोळ तसा... वास्तवात, मोडलेला म्हणजे मानभंग झालेला, अपमानित, अव्हेरलेला, दुनियादारीतून उठवलेला... या जगाशी कोणतेच देणे घेणे न उरलेला आणि तरीही या इथेच ठाम उभा राहून, आकाशातल्या नक्षत्रांशी नातेसंबंध जोडलेला... नक्षत्रे म्हणजे पुन्हा सौंदर्य, सुफलनाचा काळ... असा मी. एकटा. नास्तिक. जगापासून तुटलेला हा कवी आपल्याला 'मौनाच्या भाषांतरा'त भेटतो.

*'देवळाबाहेर थांबलेला एक खराखुरा नास्तिक*
*कंटाळलेल्या देवाला मोठ्या मिन्नतवारीने*
*परत पाठवतो देवळात*
*तेव्हा कुठे अनंत वर्षे आपण घेऊ शकतो दर्शन,*
*आस्तिकत्वाच्या भरजरी शालीत गुदमरलेल्या देवाचे...*
*एक खराखुरा नास्तिक जेव्हा देवळाबाहेर थांबतो.'*

त्यांच्या 'नास्तिक' कवितेतील कवी प्रत्यक्ष देवालाच देवळात पाठवतो आस्तिकांसाठी... कवी आपलाच आपल्या मनाशी संवाद साधताना म्हणतोय,

*तसा निरागस असतो, हसतो चेहरा माझा*
*तसे बोलतो चराचरातून 'तू' असल्याचे*
*तरी न कळते कुंपण पडले कधि श्रद्धेला*
*भाळावरल्या ठसठशीतशा एक अठीचे!*

परमेश्वर असावा का? मानावा? कवीच्या मनात संभ्रम आहे. ठामपणाने तो त्याचे अस्तित्व नाकारत नाही, तसेच

स्वीकारतही नाही. परंपरांचे ओझे पूर्णपणाने झुगारूनही देत नाही. तसेच स्वतःची होणारी गोचीही तो लपवत नाही.

*'टिळे लावुनी मद्य प्यायची लाज वाटते*
*म्हणून येवो स्वेद जरासा भाळि ईश्वर*
*पुसून जावो टिळा लावला तव नामाचा'*
हे म्हणतानाच, पुन्हा गर्र्कन वळून म्हणतो
*'अथवा उजळो कायमसाठी*
*मनगाभारा!!'*

'अंधाराच्या ओव्या'मध्ये तर तुकारामांच्या शैलीत 'बरे केले देवा। हीन जाती केले' सारखे कवी देवालाच म्हणतो

*बरा केला देवा। नाहीसा प्रकाश*
*आतला प्रवास। चालू झाला...*

आणि या अंतरंगाच्या अंतर प्रवासात अंतरंगातल्या दाट अंधारातही कवीला दिसते, ते निळे लाघव. हातावर उभे ठाकलेले... इथेही त्या घननीळ करंगळीवर गोवर्धन तोलणाऱ्याची प्रतिमा अध्याहत आहे.

आस्तिक-नास्तिकतेच्या झूल्यावर झुलणारे, संभ्रमित असलेले कवीचे मन... हा एक वेगळाच सुरस प्रवास 'मौनाच्या भाषांतरा'त अनुभवता येतो.

कविमन नेहमी त्याच्यावर, त्याच्या संवेदनाशील मनावर जे संस्कार झालेले असतील, ते आणि अंतर्मनाने टिपलेले संस्कार यांचे संमिश्रण अभिव्यक्त करत असते. स्वतःचे जीवन, इतर मानवी जीवन आणि जड व चेतनसृष्टी या सर्वांच्या जिव्हाळ्याच्या स्नेहबंधाचे अनोखे जाणीवमिश्रण त्याच्या अनुभवाचा विषय बनलेले असते. तो त्याच्या समाजाशी, सामाजिक जाणिवांशी, सांस्कृतिक संचिताशी अतूट जोडलेला असतो आणि त्यामुळेच कलावंत सामाजिक संबंध रचनेतला महत्त्वाचा बिंदू ठरतो.

अनेक दिशांनी, अनेक घटकांनी, व्यक्ति-वस्तु-निसर्ग यांच्या साहचर्याने, संयोगाने आणि संघर्षानेसुद्धा मानवी संस्कृती जीवनात अखंडपणाने वाहतच असते. ती अव्याहतपणाने चाललेली प्रक्रिया आहे. कवीवर या संस्कृतीचे परिणामही अविरत होत असतात. समाजाला अर्थ येतो, तो या सांस्कृतिक संचितामुळे आणि व्यक्तिजीवनाला अर्थ येतो, तो संचितातून निर्माण झालेल्या मूल्यांमुळे. ही सांस्कृतिक संचिताची मूल्यठेव कोणत्याच वर्णीयांची, वर्गीयांची मिराशी नसते. खरे यांच्यावर सांस्कृतिक मूल्यसंस्कार आहेत, ते मध्यमवर्गीय पांढरपेशा समाजाचे, आधुनिक काळाचे...

दोन भिन्न संस्कृतींचे संस्कार घडलेला कवी आणि त्या दोन संस्कृतींच्या संघर्षात पुन्हा भारतीय तत्त्वज्ञानाकडे झुकून सतत मनात भौतिकवादाच्या, चैतन्यवादाच्या कचाट्यात सापडलेला एखादाच कवी मराठीत नाही, तर अनेक कवी मराठी काव्याच्या प्रांतात आहेत. स्वातंत्र्य, समता, विश्वबंधुत्व सांगत सांगत मानवतावादाचा पुरस्कार करणारे केशवसुत; निसर्गसौंदर्याचा संवेदनाधिष्ठित आस्वाद घेणारे बालकवी; आयुष्यभर पाश्चात्त्य संस्कृतीचे संस्कार मनावर बाळगणारे मर्ढेकर; सांस्कृतिक संचितच झुगारून देणारे चित्रे; जड चेतनाच्या खेळात द्वैत-अद्वैताच्या संदर्भात संदेहवादीच झाले होते. मर्ढेकरांनी तर शास्त्रकाट्याची कसोटी लावत म्हटले होते,

*तुझ्या डोळ्यांच्या*
*पलिकडे काय आहे? लाय... की गोवलेले चांदणे,*
*हिमशुभ्र?*
*संगीत निःस्वरतेचे? मरणेंद्रियांना आवाहन करणारा*
*क्रूर परमार्थ?*
*मला समजत नाही, मला उमगत नाही,*
*मला कळणार नाही.*

मर्ढेकरांनी त्या काळात अशा प्रकारे संदेह व्यक्त केला होता.

'दोन मी' ही संदीप खऱ्यांची कविता वाचताना मला या संस्कृतिसंचिताचा संदर्भ देणे अपरिहार्य वाटले. कारण आधुनिक काळातली बदललेली परिस्थिती, पाश्चात्त्यांचे होत असलेले अनुकरण, बदललेली जीवनमूल्ये आणि तरीही आत असलेल्या संस्कारांचा अंतःस्थ आवाज खऱ्यांच्या कवितांमधून ऐकू येतो -

*मी हजार चिंतानी हे डोके खाजवतो*
*तो कट्ट्यावर बसतो, घुमतो, शीळ वाजवतो!*
*मज अध्यात्माचा रोज नवा शृंगार*
*लपतो न परी चेहरा आत भेसूर!*
*तो फक्त ओढतो शाल नभाची तरीही*
*त्या शामनिळ्याच्या मोरपिसापरी दिसतो!!*

संदीप खरे यांची 'मीच' ही कवितासुद्धा मुद्दाम देते.

*होय!*
*मीच आदिम सर्वाधीन, सर्वमुक्त, सर्वव्यापी*
*सर्वेश्वर...*
*मी तिटकाऱ्यांचे भावरहित स्वागत*
*स्तुति साम्राज्याचा उपभोगशून्य सम्राट...*
*मीच काळाच्या कल्पना अन् काळाची स्वप्ने!*
*मीच थेंब... झरण्यापूर्वी माझ्या असीम समुद्रात*
*साडेतीन हात देहाचे एक सोंग उसने-*

इथे कवी स्वतःलाच सर्वेश्वर म्हणतो आहे, सम्राट



अनुक्रमणिका

समजतो आहे आणि अखेर अगतिकतेने साडेतीन हात देहाचे आपण सोंग आहोत, हेही कबूल करतो आहे. पण शरणभाव मात्र नाही. संदीप खरे यांची कविता भावकविता आहे. ती वैचारिक नाही. त्यामुळे जरी ती तत्त्वचिंतनात्मक नसली, तरी त्यांच्या जीवनानुभवाचा पाया मात्र तत्त्वचिंतनाचा आहे.

'सेल्फ पोर्ट्रेट' या अभंगात ते म्हणतात,

*वेड्यावेड्यागत। काही बरळतो।*
*काही खरडतो। अधेमधे।।...*
*माझा मलासुद्धा। नाही उपयोग।*
*फसला प्रयोग। देवाजीचा।।*

'मौनाची अक्षरे' मधल्या अनेक कवितांमधून, अनेक ठिकाणी देव परमात्मा, मरण-नश्वरता, ज्ञात-अज्ञात, आस्तिक-नास्तिक अशा अर्थगहन शब्दसमूहांचा सहज संचार दिसतो. पण, तो केवळ एक नोंदवजा आविष्कार म्हणून टाळून पुढे जाता येत नाही. अवतीभवती सभोवताली सर्वत्र माणसांची, नात्यांची गर्दी असूनही अस्तित्व भारून टाकणारे एकटेपण कवीजवळ आहे आणि ताठ राहून या एकटेपणाला सामोरे जाण्याची रगही त्याच्यात आहे. मरणाचे भान असूनही स्वतःच स्वतःला सोबत करण्याची सवयही आत्मसात केली आहे...

*मातीचं घर... मातीचं दार*
*मातीच्या देहाला मातीचे वार*
*मातीच खरी, मातीच बरी,*
*मातीत माती मिसळत जगू...*
*एवढंच ना...*

'देहाची माती' हे अंतिम सत्यही संदीप खऱ्यांनी सहजपणाने पचवल्यासारखे 'एवढेच ना' मधून वाचताना अस्वस्थ करते; कारण या पहिल्याच काव्यसंग्रहातल्या ऐन तारुण्यात लिहिलेल्या त्यांच्या कविता आहेत. जितक्या सहजपणाने, सरल सुभगपणाने ते 'लव्हलेटर' लिहितात, म्हणतात -

*लव्हलेटर लव्हलेटर म्हणजे पहिला सिप असतं*
*चवीसाठी आतुरलेला टीनएजरचा लिप असतं*
*फेसाळलेल्या नशिबांसाठी हवाहवासा ग्लास असतं*
*आउट होतील त्यांच्यासाठी*
*दुसऱ्या दिवशी त्रास असतं*
*झेपेल त्यानेच घ्यावी असं*
*'विदाउट पाणी क्वार्टर' असतं!*

तितक्याच सहजपणाने ते 'बरं झालं'मध्ये लिहितात

*माझ्यावरती 'कोणी मी'*
*जळून राख बनतात*
*धूर सोडत हळूच म्हणेन*
*'बरं झालं' मी झाड झालो*
*अगदीच कुजून मरण्यापेक्षा...*

गमतीचा भाग असा आहे की, खरे यांच्या कवितेत जसे जन्म-मृत्यू, नियतीचे, अतर्क्यांचे उल्लेख येतात, तितकेच वारंवार उल्लेख प्याल्याचे, मदिरेचेही येतात.

हा प्याला शेवटचा'मध्ये ते म्हणतात,

*आता नको पाजू मला चढली अफाट*
*दिसू लागे नजरेच्या पल्याडची वाट*
*देहासवे वाटेस त्या जाणे नाही होणे*
*बहिऱ्याच्या गावी नको म्हणायला गाणे*

आता ही नशा, हा कैफ फक्त मदिरेचा नाही. दुःखाची, एकटेपणाची, निर्मितीची ही नशा आहेच. अस्तित्व शोधासाठीच चाललेली तगमग विसरण्याची नशा आहे. त्यांच्या 'अल्कोहोल', 'हँगओव्हर', 'साकी', 'मैखाना', 'काचपात्र' या कविताही आस्वादण्यासारख्या आहेत.

*व्हिस्कीबरोबर करायचा असतो*
*स्वप्निल रोमान्स... क्षण दोन क्षणांचा*
*अन् रमवर पडायचे असते तुटून प्रछन्न*
*प्रेमिकासारखे...*

असे म्हणत, जिन-ब्रँडी-बिअरबद्दलही ते बरंच काही सांगत राहतात आणि ते सांगतानाच स्त्री-पुरुष संबंधांमधल्या खुमासदार नात्यांच्या विणींबद्दलही बोलून टाकतात.

*अश्रू आणि घाम ज्यांनी मिसळुनी रक्तामधोनि*
*लाख पेले फस्त केले अन् स्वतःला मस्त केले*
*त्या बहकल्या माणसांची त्या कलंदर भंगडांची*
*ही नशा आकाश होते सर्जनाचा कोष होते*
*ही अशी व्यसने जयांची ही धरा दासी जयांची*

संदीप खरे यांची नशा ही अशी आकाश होणारी, सर्जनाचा कोश बनण्यासाठी धडपडणारी आहे.

'ही धरा दासी जयांची' ही कविता वाचताना

*थेंब त्या तेजामृताचा मज अशक्ताला मिळू दे*
*कांचनातून बद्ध जिण्या परिस पोलादी मिळू दे*
*जे स्वतःसाठीच वाहे रक्त ते सारे गळू दे*
*रक्त सारे लाल अंती पेशीपेशींना कळू दे*

मी थबकले. खरे हे सारे कुणासाठी मागत होते?

स्वतःच्या प्रतिभेसाठी? निर्मितीसाठी? सर्वांचेच रक्त शेवटी लाल आहे. अवघी मानवजात अखेर एक आहे. त्या मानवजातीसाठी?



अनुक्रमणिका

मला मर्ढेकरांच्या ओळीची आठवण झाली.

*लोभ जीभेचा जळू दे*
*दे थिजू विद्वेष सारा;*
*द्रौपदीचे सत्त्व माझ्या*
*लाभु दे भाषाशरीरा,*
*आण तूझ्या लालसेची,*
*आण लेकांची अभागी;*
*आण माझ्या डोळियांची*
*पापणी ठेवीत जागी...*

कविवर्य मर्ढेकरांचे श्रेष्ठत्व अनन्य साधारणच आहे. मात्र खरे यांनी मर्ढेकर अंतःकरणापासून आळवला आहे, हे त्यांच्या 'सेल्फ पोर्ट्रेट', 'मेंदूचा अभंग', 'अंधाराच्या ओव्या', 'फिरायला जाताना', 'चांदणं', 'दिवस असे की' अशा काही कवितांमधून प्रकर्षाने जाणवते. पण हे अनुकरण, नक्कल मात्र नाही.

'अताशा असे हे' मध्ये त्यांच्या मनाची घनघोर व्याकुळता, दुःखाची कापती तेजस्वी धार आणि अंतःस्थ वेदनेची गाज श्रेष्ठ कवी ग्रेस आठवल्याशिवाय राहत नाहीत

*कधी दाटू येता पसारा घनांचा*
*कसा सावळा रंग होतो मनाचा*
*असे हालते आत हळुवार काही*
*जसा स्पर्श पाण्यावरी चांदण्यांचा...*

'रंग चालला सोडून' मध्येही,

*चिमूटभर या दुःखाचे मज नाही ओझे*
*मी पृथ्वीचा भार साहुनी अवघडलेला*
*मी लाव्ह्याच्या सोबत आलो वाहून वरती*
*मी ना कोणा खणता खणता सापडलेला!*

संदीप खऱ्यांनी कविश्रेष्ठ ग्रेसही मनःपूर्वक आत्मसात करायचा, श्वासांत प्राणात भरून घ्यायचा प्रयत्न केला आहे. आणि तरीही स्वतःची स्वतंत्र आविष्कार पद्धत अबाधित ठेवली आहे.

'उदासीत'मध्येही ते प्रकर्षाने जाणवते.

*तुला मागता मागता शब्द आता*
*ढळे सांज दुःखापरी कापरी*
*उपेक्षून गेले मला अर्थ माझे*
*पुन्हा ओंजळी रिक्त मेघांपरी...*

*मला ऐकू येती तुझ्या चाहुली अन्*
*तुला ऐकू येती खुळे सूर हे*
*मला जाणवेना तुझा हा उन्हाळा*
*तुला पूर अज्ञात माझ्यातले...*

किंवा

'नसतेस घरी तू...' मधल्या ओळी

*तव मिठीत विरघळणाऱ्या*
*मज स्मरती लाघववेळा*
*श्वासाविन हृदय अडावे*
*मी तसा आकंतिक होतो*

ग्रेसच्या कवितेतून येणाऱ्या 'राघव-शेला' या शब्दांशी आस्वादकाला किती तरी वेळा घुटमळते केले आहे. इथेही संदीप खरे लाघववेळावर आस्वादकाला अडवतातच आणि आकांतावरून आकंतिक हे क्रियाविशेषण घडवत क्षणभरातच कासावीसही करतात. कवितेचे अर्थग्रहण करताना विशेषण, क्रियाविशेषण आणि क्रियापद समर्थ कवी अशा रीतीने वापरतो की, त्याच्या कवितेमध्ये अनुभवाची सूक्ष्मता, अनुभव समृद्धी येते आणि अर्थ प्रसरणशील होऊ शकतो. खरेही ते करतात. त्यांच्या कवितेचे हे वैशिष्ट्य आहे. आणि प्रतिभावंत कवीलाच हे शक्य होते.

आकलन-आस्वाद-विवरण आणि चिकित्सा यातूनच कवी कोणत्याही अनुभवाची प्रतीती घेत असतो. कवीच्या अंतःकरणातली सहजस्फुरणे, इच्छाशक्ती, बुद्धी आणि भावना त्याच्या नवनिर्माणाच्या पाठीशी असतात. त्याची ही निर्मिती म्हणजे त्याच्या व्यक्तिगत सम्यक ईक्षणाचेच फल असते. कवी स्वतःच जीवनाची समीक्षा करत असतो आणि जीवनाची बिंबे-प्रतिबिंबे आस्वादकाला दाखवत असतो. संदीप खरे यांनी 'मौनाची अक्षरे'मधून अत्यंत समर्थपणाने ही जीवनसमीक्षा प्रतिबिंबित केली आहे. कोणत्याही पक्षाचे, विचारसरणीचे, वर्गाचे झेंडे खांद्यावर न वागवता जे जीवन जसे वाट्याला आले, तसे ते त्यांनी रंगवले आहे. खूप दिवसांनी अत्यंत सकस कवितेचा निखळ आनंद घेतल्याचे समाधान संदीप खरेंच्या कविता वाचताना मिळाले.

संदीप खरे यांची कविता अशीच बहरत फुलत राहो, ही सदिच्छा.

■

**कल्याणी हर्डीकर**
चलभाष : ९९२३०८०२८१



अनुक्रमणिका









पुस्तक परीक्षण

प्रा. डॉ. अशोक शिंदे

# 'माझे संचित' : एक चिंतनीय आत्मकथन



**महाराष्ट्राचे शिल्पकार या नात्याने यशवंतराव यांना ओळखले जाते. यशवंतराव चव्हाण या देशाचे उपपंतप्रधान होते. 'यशवंतराव चव्हाण राजकारणातील मानवी चेहरा' या लेखात गडाख साहेबांनी नेमकेपणाने यशवंतराव चव्हाणांचे मोठेपण व्यक्त केले आहे. सामाजिक, आर्थिक, औद्योगिक, शेती आणि शिक्षण या सगळ्यांचा चेहरामोहरा त्यांनी बदलून टाकला. महाराष्ट्रात सहकार ही एक चळवळ आहे. साहेबांच्या विचाराने भारावलेल्या त्या पिढीतील कार्यकर्त्यांनी स्वतःला या सहकाराच्या उभारणीतून झोकून दिले.**






यशवंतराव गडाख यांचे 'माझे संचित' हे पुस्तक त्यांच्या अमृत महोत्सवी वर्षानिमित्त त्यांनी लिहिलेले आहे. या पुस्तकांच्या अर्पणपत्रिकेत कृतज्ञतापूर्वक राजकारण, समाजकारण क्षेत्रात ५० वर्षे पूर्ण झाल्याबद्दल ते लिहितात, '१९६७ साली मी अहमदनगर जिल्हा परिषदेची निवडणूक लढविली. २०१७ ला राजकारण, समाजकारण, साहित्य, सहकार या क्षेत्रांच्या कारकिर्दीला ५० वर्षे पूर्ण होत आहेत. मला सहकार्य करणाऱ्या मित्रांना, कार्यकर्त्यांना, जनतेला कृतज्ञतापूर्वक'. या पुस्तकाच्या प्रस्तावनेत डॉ. सदानंद मोरे लिहितात, यशवंतराव गडाख हे भाबडेपणाने लेखन करणारे गृहस्थ आहेत असे मात्र नाही. राजकारणात उणेपुरे अर्धशतक काढलेला हा माणूस आहे. माणसे प्रसंगी कशी व किती स्वार्थी होतात, हे त्यांना माहीत आहे. माणसाच्या मूलभूत भलेपणावर त्यांचा विश्वास आहे. यशवंतराव चव्हाणांवरील त्यांचा लेख वाचताना वाचकाला स्वत: गडाखांची ओळख आपोआप होते. 'संचित'मधील दुसरा लेख गडाखांनी वडिलांबद्दल लिहिला आहे. एकेकाळच्या ब्राह्मणेतर चळवळीतून शिक्षणाची प्रेरणा घेऊन स्वकष्टाने मोठे झालेल्या वडिलांनी आपल्या मुलाला प्रेरणेबरोबर स्वातंत्र्यही दिले. त्यामुळे यशवंतरावांना हे दिवस पाहावयास मिळाले. अंबोली गावचे निसर्गसौंदर्य तिसऱ्या प्रकरणात दिले आहे. ज्यांना महाराष्ट्राने चव्हाण साहेबांच्या मार्गाने जावे असे वाटते, त्यांनी गडाख साहेबांचे बोट धरून वाटचाल करावी अशी माझी धारणा आहे. अशा प्रकारे डॉ. सदानंद मोरे यांनी प्रस्तावनेत मार्मिक विचार मांडले आहेत.

यशवंतराव गडाख साहेबांनी या पुस्तकाच्या मनोगतात म्हटले आहे की, भाषणातून विचार मांडणे आणि लेखनातून विचार मांडणे वेगळे पण मला योगायोगाने या दोनही संधी मिळाल्या. या पुस्तकातील पत्र संवाद म्हणजे लेखकाने पत्रे पाठविली. हा माझ्या आठवणींचा ठेवा आहे. त्यामुळे मला बळ मिळत गेले. मला उत्साह देणाऱ्या लेखकांचा, वाचकांचा, मित्रांचा मी ऋणी आहे. मी या ऋणातच राहू इच्छितो.

यशवंतराव गडाख साहेबांनी या पुस्तकात आठ प्रकरणे लिहिली आहेत. यशवंतराव चव्हाण राजकारणातील मानवी चेहरा, माझे वडील, माझं अंबोली, माझा देश- त्यांचा देश, सगळंच काही बिघडलेलं नाही, टपरी, घुंगरू की तरह, पांडेजी त्याचबरोबर प्रतिसाद म्हणून अरुण साधू, द.ता. भोसले, मधु मंगेश कर्णिक यांचे तीन लालित्यपूर्ण लेख आहेत. शेवटी पत्र संवाद आहेत. गडाख साहेबांच्या 'अर्धविराम', 'सहवास', 'अंतर्वेध' यांवर विविध मान्यवर लेखकांची आलेली १०१ पत्रे दिलेली आहेत.

महाराष्ट्राचे शिल्पकार या नात्याने यशवंतराव यांना ओळखले जाते.



अनुक्रमणिका



यशवंतराव चव्हाण या देशाचे उपपंतप्रधान होते. 'यशवंतराव चव्हाण राजकारणातील मानवी चेहरा' या लेखात गडाख साहेबांनी नेमकेपणाने यशवंतराव चव्हाणांचे मोठेपण व्यक्त केले आहे. सामाजिक, आर्थिक, औद्योगिक, शेती आणि शिक्षण या सगळ्यांचा चेहरामोहरा त्यांनी बदलून टाकला. महाराष्ट्रात सहकार ही एक चळवळ आहे. साहेबांच्या विचाराने भारावलेल्या त्या पिढीतील कार्यकर्त्यांनी स्वत:ला या सहकाराच्या उभारणीतून झोकून दिले. आज मला वाटते की, चव्हाण साहेबांनी मान, सत्ता, अधिकार जेवढे भोगले, त्यापेक्षा अपमान, अवहेलना, विरोध यांचे दु:ख अधिक भोगले. (पृ.३५) अशा प्रकारे यशवंतराव चव्हाणांनी सहकार क्षेत्रातील ऋणानुबंध मानले. स्वत:च्या जीवनात चव्हाण साहेबांमुळे आत्मभान कसे आले, हे या लेखात स्पष्ट केले आहे. चव्हाण साहेबांचा कार्यकर्ता म्हणून जी ओळख आहे, त्याचा सार्थ अभिमान गडाख साहेबांना वाटतो, असे रोखठोक उद्‌गार या लेखाच्या शेवटी त्यांनी काढले आहेत.

'माझे वडील' या लेखात ते म्हणतात, एक दिवस वडिलांनी मला बोलावून घेतले आणि सांगितले की, 'तू आता नगरला कॉलेजला जा, आम्ही येथून जेवणाचा डबा पाठवू. आमच्या या परिस्थितीवर आम्हाला सोड, चांगला शिक आणि आम्हाला यातून बाहेर काढ बाबा.' अशी जीवनदायी प्रेरणा देणाऱ्या गडाख साहेबांनी आपल्या जीवनावरची पितृछाया किती बलवत्तर होती याचे विवेचन केले आहे. पोलिस खात्यात सीआयडी इन्स्पेक्टर होऊ नको, राजकारण हे क्षेत्र देखील अनिश्चिततेचे आहे. तुझा निर्णय तू घे, पण एकदा निर्णय घेतला की त्यावर ठाम राहा आणि सर्व आयुष्य त्यात झोकून दे! (पृष्ठ ५०) अशा प्रकारे यशवंतराव गडाखांनी आपल्या वडिलांविषयी कृतज्ञतेने लिहिलेले आहे. माणूस मोठ्या पदावर गेला की, आईवडिलांना विसरतो, त्यांचे नाव घेण्याचे टाळतो, काही जण तर आईबापांना वृद्धाश्रमात, पाठवतात. अशा आजच्या काळातील पार्श्वभूमीवर हा लेख खरोखर चिंतनीय आहे. लेखाच्या शेवटी कठोरपणामध्ये दडलेला एक प्रेमळ पिता आण्णा आहेत हे स्पष्ट केले आहे.

'माझं अंबोली' हा लेख वाचकाने वाचला म्हणजे प्रत्येकाने कोकणात प्रत्यक्ष जाऊन दर्शन घेतल्यासारखे वाटते. पावसाळ्यामध्ये अंबोलीचे सौंदर्य कसे मनोवेधक आहे, याचा वस्तुपाठ गडाख साहेबांनी या तिसऱ्या प्रकरणात मांडला आहे. अंबोलीच्या समाजजीवनाचा सूक्ष्मपणे वेध घेतला आहे. हा लेख संपवताना ते लिहितात, तिथला निरागसपणा, तिथली एकमेकांना धरून राहण्याची संस्कृती, आपलेपणा, शेकडो वर्षांच्या सणवार, यांच्या परंपरा, संथ पण प्रेमळ असं गावजीवन. हे सगळे नवीन आघात अंबोली सहन करू शकेल का, याची मला चिंता वाटते. (पृष्ठ ६६) अशा प्रकारे 'माझं अंबोली' हे प्रकरण कोणालाही निसर्ग सौंदर्याचे वरदान असणाऱ्या कोकण भूमीविषयी प्रेम वाटावे असे आहे.

'माझा देश- त्यांचा देश' या चौथ्या प्रकरणात गडाख साहेबांनी बाबा आमटे, प्रकाश आमटे यांची कर्मभूमी असणाऱ्या गडचिरोली, चंद्रपूर, मेळघाट या क्षेत्रातील नक्षलवाद्यांचा प्रभाव असणाऱ्या भागाविषयी निरीक्षण स्पष्ट केले आहे. कलावती या आदिवासी स्त्रीचे नृत्य, गाणे, तेथील लोकांचे, मुलांचे नाचगाण्यांचे वर्णन करून त्या भागातील लोकसंस्कृतीचा परिचय करून दिला आहे. (पृष्ठ ८१) या लेखाच्या शेवटी एक वयस्क बाई साहेबांना म्हणते, 'तुमचा देश एकदा दाखवा ना आम्हाला'. तिच्या बोलण्याने मी अस्वस्थ झालो. तिला आपल्या गावापलीकडे काहीच माहीत नव्हते. स्थलांतर तिच्या स्वप्नातही नव्हते. स्थलांतरित लोकांच्या यशोगाथा आपण वाचतो पण या अस्थलांतरित समाजाचे काय होईल? रस्ते नाही, वीज नाही, फोन नाही, शाळा नाही, कुपोषणाने मुलं दगावतात.. अशा प्रकारे लेखाच्या शेवटी लेख वाचता-वाचता वाचक अंतर्मुख होतो. या लेखातून लेखकाने मेळघाट परिसरातील आदिवासी लोकजीवनाची ओळख सहजतेने करून दिलेली आहे.

'सगळंच काही बिघडलं नाही' या पाचव्या प्रकरणात वेकुर्ली या आदिवासी वस्ती असलेल्या कोकणात बारामतीचा शिक्षक उत्साहाने आदिवासी मुलांत काम करतो, शाळेत रममाण होतो, ध्येयनिष्ठेने दुर्गम आदिवासी पाड्यावर काम करणारे हे शिक्षक पाहून लेखकाने त्यांचे कौतुक केले आहे. सर्व प्रकारच्या गैरसोयी सहन करून दारिद्र्य आणि गरिबी पाचवीला पुजलेल्या आदिवासी शेतमजूर, शेतकरी यांच्या मुलामुलींना शिक्षण देता येतं, अशा त्या दोन प्राथमिक शिक्षकांना माझा मनापासून सलाम.(पृष्ठ ८९)

'टपरी' या सहाव्या प्रकरणात गडाख साहेबांनी सामान्य माणसाविषयीची माणुसकी प्रकट केली आहे. महाबळेश्वर, वाईपाशी टपरीत जेवणाचा आस्वाद आनंदाने कसा घेतला, हे सांगून माळशेज घाटापाशी कोलखास रेस्ट हाउस ते सीमाडोह गावापर्यंत मध्ये असणाऱ्या टपरीत १०-१५ अदिवासींना त्यांनी आनंदाने नाष्टा दिला. हे वर्णन करताना लेखकाचा दयाळूपणा प्रचितीला येतो. एका टपरीवर गडाख साहेब संसद सदस्य असताना नगरहून माळशेज घाटातून जात असताना त्यांचा ड्रायव्हर बेशुद्ध पडला. त्या टपरीवाल्याने रात्रीचाच उरलेला माल सकाळी नाष्ट्याला वड्यात वापरला होता. त्यामुळे ड्रायव्हर बेशुद्ध झाला. तरीपण गडाख साहेबांनी त्याच्यावर पोलिस केस केली नाही. या लेखाच्या शेवटी गडाख साहेब

म्हणतात, प्रवासात निसर्ग भेटतो, पशु-पक्षी, प्राणी भेटतात आणि त्यातही आपण ठरवल्यानंतर वेगवेगळी माणसं

भेटतात. आपण कोण आहोत, या कोशातून बाहेर पडलं की, त्यांच्यात समरस होता येतं. त्यांची सुख-दुःख ते सांगतात. त्यातून काहींचे स्नेहबंध निर्माण होतात आणि ते आयुष्यभर टिकतात... (पृष्ठ १०२)

'घुंगरू की तरह' या सातव्या प्रकरणात काश्मीरमधील विस्थापित झालेल्या परिस्थितीवर गुलजारभाईसारख्या ड्रायव्हर माणसाची हकीगत सांगितली आहे. वैभवात जगणारा गुलजारभाई काश्मीरमधील दहशतवादी परिस्थितीमुळे दिल्लीत स्थायिक होतो. त्याची मुलं दिल्लीत काम करतात. गुलजारभाई हिंदी गाणी म्हणायचा

घुंगरू की तरह बजता ही रहा हूं मै
कभी इस पग में, कभी उस पग में

दिल्लीमध्ये साहेबांच्या गळ्यात पडून हे गाणं म्हणत तो मनसोक्त रडला आणि साहेबांना म्हणाला, अतिरेक्यांच्या तावडीत आपली मुलं जाऊ नये म्हणून त्यांनी वतन सोडले, एक अनोळखी जग गाठले, पण न घावरता जिद्दीनं आपल्या चिल्ल्यापिल्ल्यांवर मायेची चादर अंथरली, त्यांना शिकवलं मोठं केलं, पण सैतानी प्रवृत्तीच्या आहारी जाऊ दिलं नाही.. (पृष्ठ ११०) अशा प्रकारे परिवर्तनशील असणाऱ्या, स्वाभिमानी पण जिद्दीने जगणाऱ्या गुलजारभाईचं वर्णन गडाख साहेबांनी वाचकांना भावेल असे केले आहे.

'पांडेजी' या आठव्या प्रकरणात ड्रायव्हर असणाऱ्या सामान्य माणसाच्या मनात स्वच्छतेविषयी कशी आवड आहे याचे चित्रण केले आहे. पांडे शरीराने घष्टपुष्ट होते. गोरापान रंग, इतर कुठलंही व्यसन नाही पण, पान खाण्याचा भारी शौक. पांडेची सर्वांशी घनिष्ठ दोस्ती. पांडेंनी पानठेल्याशेजारी प्लास्टिक कंटेनर ठेवला होता. पान खाणाऱ्यांना पांडे म्हणायचा, पान खाऊन पाचच मिनिटं इथंच थांबा, या डब्यातच थुंका. रस्त्यात थुंकायचे नाही. (पृष्ठ ११५)

मोदींचं स्वच्छता अभियान पांडेच्या मनात आणि व्यक्तिमत्त्वात कसे भिनलेले आहे, हे गडाख साहेबांनी या लेखात स्पष्ट केले आहे. अशा प्रकारे पृष्ठ १ ते ११५ पर्यंत आठ प्रकरणांत 'माझे संचित' हे मार्मिक पुस्तक वाचकांना अंतर्मुख करतं.

'माझे संचित'मध्ये गडाख साहेबांच्या 'अर्धविराम', 'सहवास' व 'अंतर्वेध' या पुस्तकांना ज्यांनी अभ्यासपूर्ण प्रस्तावना दिल्या, त्यांचे विचार दिलेले आहेत. अरुण साधू 'अर्धविराम'विषयी 'अंतर्दृष्टी देणारे पुस्तक' असे सांगून त्याविषयी लिहितात, अजून तरी मराठीमध्ये राजकीय पुढाऱ्यांनी लिहिलेली आत्मचरित्रं कमीच आहेत. आपल्या आयुष्याची नोंद ठेवणे हे एक महत्त्वाचं काम आहे हे उमजून गडाखांच्या सफल प्रयत्नापासून इतर राजकीय नेत्यांनी स्फूर्ती घेतली तर मराठी समाजाचे आणि राजकारणाचे आकलन करण्याचे उत्तम साधन निर्मिल्याचे त्यांना श्रेय लाभेल. (पृष्ठ १२९)



**'माझे संचित'मध्ये गडाख साहेबांच्या 'अर्धविराम', 'सहवास' व 'अंतर्वेध' या पुस्तकांना ज्यांनी अभ्यासपूर्ण प्रस्तावना दिल्या, त्यांचे विचार दिलेले आहेत. अरुण साधू 'अर्धविराम'विषयी 'अंतर्दृष्टी देणारे पुस्तक' असे सांगून त्याविषयी लिहितात, अजून तरी मराठीमध्ये राजकीय पुढाऱ्यांनी लिहिलेली आत्मचरित्र कमीच आहेत. आपल्या आयुष्याची नोंद ठेवणे हे एक महत्त्वाचं काम आहे हे उमजून गडाखांच्या सफल प्रयत्नापासून इतर राजकीय नेत्यांनी स्फूर्ती घेतली तर मराठी समाजाचे आणि राजकारणाचे आकलन करण्याचे उत्तम साधन निर्मिल्याचे त्यांना श्रेय लाभेल.**



'अंतर्वेध' या पुस्तकास डॉ. द.ता. भोसले यांनी 'समृद्ध व्यक्तिमत्त्व' असे विचार प्रस्तावनेतून मांडताना म्हटले आहे की, त्यांचे हे संपूर्ण लेखन स्व आणि समाजाचा शोध घेणारे आहे. उज्ज्वल भविष्यासाठी भूतकाळाचे स्मरण करणारे आहे. भेगाळत चालणाऱ्या कृषी संस्कृतीला अधिष्ठान देणारे आहे. भौतिक प्रगतीला आत्मिक उन्नतीची साथ हवी, असे संदेश देणारे आहे. हे लेखन वाचकाला एकाच वेळी निर्भेळ आनंदही देते आणि अस्वस्थही करून सोडते. उत्कृष्ट साहित्याची ही एक उत्कृष्ट कसोटीच मानली जाते. म्हणूनच 'अंतर्वेध' या ग्रंथाचे स्वागत केले पाहिजे. (पृष्ठ १४३)

मधु मंगेश कर्णिक यांनी 'अंतर्वेध'साठी 'एक मित्र एक लेखक' हा लेख लिहिला. त्यात ते म्हणतात, यशवंतराव गडाख पाटील यांची वाङ्मयीन अभिरुची अव्वल दर्जाची आहे. वाचन अमर्याद आहे, या साऱ्यामुळे त्यांचे व्यक्तिमत्त्व रसिक, बहुश्रुत असे वाटते. आमच्या ग्रामीण भागात, काळ्या शिवारात, शेतीभातीत, शैक्षणिक, सामाजिक कार्यांत रमलेला हा दोस्त साहित्याच्या क्षेत्रातही दमदार पावले टाकू लागल्याचा सुखद प्रत्यय त्यांचे साहित्य वाचल्यावर येतो..' (पृष्ठ १५७)

'पत्रसंवाद' या भागात यशवंतराव गडाखांच्या साहित्याविषयी, त्यांच्या राजकीय कारकिर्दीविषयी त्यांच्या मित्र असणाऱ्या लेखकांनी, साहित्यिकांनी जवळपास १०१ पत्रं लिहिलेली आहेत. 'अर्धविराम'- ४१, 'सहवास'-४२, 'अंतर्वेध'- १५ असा पत्रव्यवहार सविस्तरपणे दिला आहे. डॉ.रवींद्र शोभणे, आनंद यादव, प्रतिभा रानडे, मुकुंद

टाकसाळे, नारायण सुर्वे, हरी नरके, इंद्रजित भालेराव, डॉ.निर्मलकुमार फडकुले, डॉ. रावसाहेब कसबे, रवींद्र पिंगळे, अरुणा ढेरे, रा.रं. बोराडे, डॉ. प्र.चिं. शेजवलकर, डॉ.जनार्दन वाघमारे, रंगनाथ पठारे, डॉ. नरेंद्र दाभोळकर, बाबा कदम, शिरीष पै, विश्वास नांगरे पाटील, ग.प्र. प्रधान, डॉ. अभय बंग, गिरीजा कीर, डॉ. भा. लं. भोळे, डॉ. सु. प्र. कुलकर्णी, हुसेन दलवाई, प्रशांत गडाख, प्राचार्य डॉ. यशवंत पाटणे, विजय नांगरे, सुधीर मनगुंटीवार अशा प्रकारे पृष्ठ १६५ ते २०० पर्यंत हा पत्रसंवाद रेखाटलेला आहे.

या पत्रसंवादातील तीन निवडक पत्रातील विचार खालीलप्रमाणे देत आहे.

१. डॉ. जनार्दन वाघमारे (अर्धविराम)- अतिशय ओघवत्या भाषेत आपण 'अर्धविराम' लिहिले आहे, आपल्या राजकीय जीवनाचा त्यात आलेख आहे. राजकीय कार्यकर्त्यांना हे पुस्तक प्रेरणा देईल. (पृष्ठ १९०)

२. साहित्यिक ग.प्र. प्रधान (सहवास)- मी आपले आत्मचरित्र वाचले होते. नुकतेच आपले 'सहवास' हे पुस्तक वाचले. मला आपली दोन्ही पुस्तके आवडली. आपले कार्य, आपली ज्ञानोत्सुक वृत्ती आणि आपले चारित्र्य याबद्दल मला आदर आहे. (पृष्ठ २०३)

३. साहित्यिक डॉ. सु. प्र. कुलकर्णी- सोनई परिसरात आपण आंतरराष्ट्रीय ख्यातीचे प्रतिभावंत तुम्ही (प्रशांतला प्रेरणा देऊन) सोनईकरांना दाखवले. गुलजार, अमृता प्रीतम, गिरीष कर्नाड, बासु भट्टाचार्य, रघुनाथ माशेलकर, प्रकाश आमटे अशा अनेक दिग्गजांना बोलावून तुम्ही त्यांचा सन्मान केलात. जे जे उत्तम, उदात्त, उन्नत आहे, त्याच्या जीवनाचे वाटसरू होण्याचा तुम्ही प्रयत्न करता. समोरचा दुखावेल असे तुम्ही कधीच बोलत नाही की, चेहऱ्यावर दाखवत नाहीत.. (पृष्ठ २३७)

अशा प्रकारे राजकारणापलीकडेही एक मैत्रीचं नातं असणारे महाराष्ट्रातील सर्व मान्यवर साहित्यिक, विविध राजकीय पक्षातील नेते यांच्याशी आपुलकीचे, स्नेहाचे भावबंध असणारे, सुसंस्कृत नेतृत्व असणारे दिलदार व दमदार साहित्यिक म्हणजे यशवंतराव गडाख साहेब आहेत हे वाचकांना 'माझे संचित' हे पुस्तक वाचून जाणवते.

■

**प्रा. डॉ. अशोक शिंदे**
संचालक, मराठी संशोधन केंद्र,
श्री ज्ञानेश्वर महाविद्यालय, नेवासा
चलभाष : ९८८१९४०४४२

---



कार्यवृत्त

प्रकाश पायगुडे

# म.सा.प. पुणे शाखा कार्यवृत्त नोंद
## (१ सप्टेंबर २०१७ ते ३१ डिसेंबर २०१७)

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा सोलापूर (मुख्य शाखा)

**दि. ३ सप्टेंबर २०१७ : वार्षिक सर्वसाधारण सभा :**

महाराष्ट्र साहित्य परिषद, सोलापूर शाखेची ७४वी वार्षिक सर्वसाधारण सभा दिनांक ३/९/२०१७ रोजी सायंकाळी ५.०० वाजता डॉ. निर्मलकुमार फडकुले सभागृह, सोलापूर येथे खेळीमेळीच्या वातावरणात पार पडली. सोलापूरचे ज्येष्ठ साहित्यिक ल. सि. जाधव यांच्या 'होरपळ' या आत्मकथनाच्या 'दाह' या हिंदी अनुवाद ग्रंथास अखिल हिंदी साहित्य सभा, नवी दिल्ली यांचे वतीने 'विद्योत्तम' हा पुरस्कार प्राप्त झाल्याप्रीत्यर्थ अभिनंदनाचा ठराव मंजूर करण्यात आला.

**दि. १७ सप्टेंबर २०१७ : 'शोध कवितेचा' कार्यक्रम :**

शाखेच्या अमृतमहोत्सवानिमित्त कल्पक, पुणे निर्मित 'शोध कवितेचा' हा नृत्य, गायन, अभिनय आणि दृक्‌श्राव्य माध्यमांच्या उपयोजनासह वहारदार कार्यक्रम सादर झाला. कार्यक्रमाची संकल्पना, लेखन व दिग्दर्शन महेश पाटणकर यांची होती. कवितांचे सादरीकरण गौरी गोळे-लिमये, वंदना जोगळेकर, धनंजय दीक्षित, यशस्वी पुणेकर, अनुराधा पाठक, विजय केळकर, महेश पाटणकर यांनी केले. यावेळी 'श्रावणधारा' या परिषदेने आयोजित केलेल्या युवा-काव्यस्पर्धेचे पारितोषिक वितरण करण्यात आले. या काव्यस्पर्धेस साडेतीनशे युवा-युवतींनी सहभाग नोंदवला होता.

**दि. १ ऑक्टोबर २०१७ : 'अमृतसिद्धी सोहळा' :**

४ ऑक्टोबर १९४२ रोजी स्थापन झालेल्या सोलापूर शाखेचा अमृतमहोत्सव वर्षभर साजरा केला. याची सांगता १ ऑक्टोबर रोजी 'अमृतसिद्धी' सोहळ्याने झाली. माजी केंद्रीय गृहमंत्री सुशीलकुमार शिंदे अध्यक्षस्थानी होते. प्रमुख अतिथी म्हणून उपस्थित असलेले डॉ. डी. वाय. पाटील अभिमत विद्यापीठाचे कुलगुरू डॉ. पी. डी. पाटील व प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी संस्थेच्या कार्याची प्रशंसा केली. यावेळी कवी ना. धों. महानोर व कवी रामदास फुटाणे यांच्या पंच्याहत्तरीनिमित्त त्यांचा मानपत्र व स्मृतिचिन्ह देऊन सत्कार करण्यात आाल. यावेळी दोन्ही कविवर्यांची प्रकट मुलाखत सुनील शिनखेडे व डॉ. सुहास पुजारी यांनी घेतली.

**दि. १३ ऑक्टोबर २०१७ : 'वाङ्मयचर्चा' :**

'सोलापूरचे एक उपेक्षित मानकरी' या विषयाच्या अनुषंगाने संत वाङ्मयाचे अभ्यासक डॉ. अशोक कामत, पुणे यांनी संवाद साधला. डॉ. श्री. द. कुलकर्णी यांनी भारतीय संस्कृतीच्या इतिहासाचे अठरा खंड लिहिले. हे खंड प्रथम इंग्रजीत लिहून त्याचा मराठीत अनुवाद केला. हे त्यांचे मोठे कार्य उपेक्षित राहिले होते. त्यांच्या कार्यावर डॉ. कामत यांनी प्रकाश टाकला. या चर्चेस डॉ. सुहास पुजारी, बाबुराव मैंदर्गीकर, बद्दीउज्जमा विराजदार आदी पदाधिकाऱ्यांसह साहित्यरसिक उपस्थित होते.

कार्यक्रमांसाठी विशेष परिश्रम घेणारे पदाधिकारी - डॉ. सुहास पुजारी, दत्ताअण्णा सुरवसे, ॲड. जे. जे. कुलकर्णी, बाबुराव मैंदर्गीकर, मारुती कटकधोंड, बद्दीउज्जमा बिराजदार, राजेंद्र भोसले, नरेंद्र काटीकर, डॉ. श्रुती वडगबाळकर, माधव पवार, निर्मला मठपती, किशोर चंडक, राजेंद्र कोठावळे, ॲड. रेवणसिद्ध पाटील, वंदना कुलकर्णी, ब. गो. अहंकारी.

---

## महाराष्ट्र साहित्य परिषद, पिंपरी चिंचवड शाखा

१. महाराष्ट्र साहित्य परिषद पिंपरी चिंचवड शाखेतर्फे १९ सप्टेंबर २०१७ रोजी 'विद्यार्थी वाचन स्पर्धा' हा कार्यक्रम घेण्यात आला. निगडी येथील कीर्ती विद्यालय येथे ५वी ते ७वी आणि ८वी ते ९वी अशा दोन गटात ही वाचन स्पर्धा घेण्यात आली. ५वी ते ७वी गटात ३ पारितोषिके व १ उत्तेजनार्थ तसेच ८ वी ते ९वीच्या गटात तीन पारितोषिके व दोन उत्तेजनार्थ पारितोषिके देण्यात आली. श्रीमती विनिता ऐनापुरे आणि अपर्णा मोहिले यांनी परीक्षक म्हणून काम पाहिले.

२. दिनांक ८ ऑक्टोबर २०१७ रोजी चिंचवड येथील 'खुशबू' सभागृहात शाखेतर्फे 'हा वेल प्रीतीचा सुंदर' हा कार्यक्रम घेण्यात आला. कवी संजय जगताप, बी. एस. बनसोडे, माधुरी मंगरुळकर, मीना शिंदे यांच्या शब्दांना सूर देऊन संगीतकार नंदिन सरीन व त्याच्या सहकाऱ्यांनी रसिकांची संध्याकाळ सुरेल केली. भक्ती, प्रेम, शृंगार, निसर्ग, वात्सल्य इत्यादी रसांनी परिपूर्ण

असलेल्या काव्यातील गाण्यास रसिकांनी उदंड प्रतिसाद दिला.

३. मसाप शाखा पिं.चिं.ने १५ ऑक्टोबर २०१७ रोजी दिवाळी निमित्त 'काव्यपहाट', 'काव्य रंगे उषःकाल संगे' या कार्यक्रमाचे आयोजन केले होते. कार्यक्रमाच्या अध्यक्षपदी साहित्यिक लक्ष्मीकांत देशमुख तर प्रमुख पाहुणे म्हणून मसापचे प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे, डॉ. दीपक साळुंखे, डॉ. माउली फरांदे उपस्थित होते. सदर कार्यक्रमात 'अक्षरवेध' या दिवाळी अंकाचे प्रकाशन झाले. त्या वेळी बुकशेल्फचे निखिल वझे, शाखा अध्यक्ष राजन लाखे, विनिता ऐनापुरे, मकरंद बापट उपस्थित होते. या कार्यक्रमात ४५ कवींनी एकाहून एक सुरस कविता व गझल सादर करीत वातावरण काव्यमय व नादमय केले. नितीन सुतार यांनी साहित्यिक प्रश्न विचारून प्रश्नमंजूषा या कार्यक्रमातून रसिकांना बोलते केले.

४. दि. ८ नोव्हेंबर रोजी पिं.चिं. शाखा आणि स्वरयज्ञ संस्था यांच्या संयुक्त विद्यमाने 'काव्यस्वरसंध्या' हा कार्यक्रम आयोजित करण्यात आला. सदर कार्यक्रमात गायक अविनाश लेले व गायिका सायली सांबारे यांचा सहभाग होता. सदर संध्याकाळी १४ कवींनी काव्यस्वरातून तर गायकांनी आपल्या सुरेल स्वरांनी रसिकांना खिळवून ठेवले.

५. दि. २८ नोव्हेंबर रोजी ज्येष्ठ साहित्यिक राजन खान यांचे 'अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनात अध्यक्षाची भूमिका' या विषयावर मसाप पिं.चिं. कार्यालयात व्याख्यान झाले. रसिकांनी साहित्य संमेलनाबाबत विचारलेल्या विविध प्रश्नांची राजन खान यांनी मनमोकळी उत्तरे दिली.

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा दक्षिण सोलापूर

१. दि. ८ /१०/२०१७ : नवोदित लेखिका व मसाप दक्षिणच्या अध्यक्षा सौ. रेणुका महागावकर यांच्या 'सुजाण पालकत्व' तसेच 'तुमच्यासाठी' हा काव्यसंग्रह या दोन पुस्तकांचे प्रकाशन माजी उपविभागीय आयुक्त पुणे श्री. शामजी देशपांडे यांचे हस्ते करण्यात आले. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी ना. सुभाष देशमुख, सहकार व पणन मंत्री महाराष्ट्र हे होते. या प्रसंगी श्री. पद्माकर कुलकर्णी, मसाप पुणे सोलापूर जिल्हा प्रतिनिधी, हास्यसम्राट श्री. दीपक देशपांडे यांची प्रमुख उपस्थिती होती.

२. दि. १३, १४, १५ ऑक्टोबर २०१७ : दरवर्षीप्रमाणे याही वर्षी दिवाळीपूर्व व दीपावलीनिमित्त 'विवेकाची अमृतवाणी' हा निरूपणाचा कार्यक्रम झाला. ज्येष्ठ निरूपणकार श्री. विवेकजी घळसासी यांचे प्रार्थना-पथ, प्रार्थना-पाथेय आणि प्रार्थना-परमपद या विषयांवर सलग ३ दिवस निरूपण झाले.

३. दि. १२/११/२०१७ : सोलापुरातील नवोदित तरुण उद्योजक व होतकरू व विद्यार्थ्यांना मार्गदर्शन व्हावे या उद्देशाने श्री. धनंजयजी दातार यांच्या मुलाखतीचा कार्यक्रम किर्लोस्कर सभागृह येथे आयोजित केला होता. श्री. धनंजय दातार हे दुबईतील प्रसिद्ध मसाला उद्योजक आहेत. त्यांची मुलाखत मुंबईच्या आकाशवाणी व दूरदर्शन निवेदिका सौ. उत्तरा मोने यांनी घेतली.

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा जुळे सोलापूर

१. दि. ५/८/२०१७ : महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा जुळे सोलापूरचा सहावा वर्धापनदिन सोहळा हा शनिवार दि. ५ ऑगस्ट २०१७ रोजी हिराचंद नेमचंद वाचनालयाच्या ॲम्फी थिएटरमध्ये आयोजित केला होता. या निमित्ताने 'स्व. सौ. सुनेत्रा श्रीनिवास कुमठेकर स्मृतिप्रीत्यर्थ पुरस्कार' सुप्रसिद्ध नेत्ररोगतज्ज्ञ डॉ. सौ. माधुरी वाळवेकर यांना त्यांच्या सामाजिक कार्यासाठी तर 'स्व. कर्नल प्रभाकर लांडगे स्मृती पुरस्कार' साहित्यसेवेसाठी सुप्रसिद्ध लेखक श्री. समीर गायकवाड यांना, डॉ. वासुदेव रायते यांच्या अध्यक्षतेखाली डॉ. वैशंपायन मेमोरियल मेडिकल कॉलेजचे अधिष्ठाता डॉ. सुनील घाटे यांचे शुभहस्ते प्रदान करण्यात आले. मान्यवरांचे स्वागत कार्याध्यक्ष सौ. सायली जोशी यांनी तर प्रास्ताविक अध्यक्ष पद्माकर कुलकर्णी यांनी केले. या कार्यक्रमाचे सूत्रसंचालन कु. अर्पिता खडकीकर यांनी तर आभार प्रदर्शन प्रमुख कार्यवाह गिरीश दुनाखे यांनी केले. या कार्यक्रमानंतर लगेचच 'स्व. जितेंद्र अभिषेकी यांचे शिष्य मा. दीपकजी कलढोणे यांचा भावगीत, भक्तिगीत व नाट्यगीतांवर आधारित 'भावपुष्पे' हा कार्यक्रम झाला.

२. दि. ३/९/२०१७ : महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा जुळे सोलापूरची सहावी वार्षिक सर्वसाधारण सभा ही रविवार दि. ३ सप्टेंबर २०१७ रोजी 'आनंदश्री' ३० जवाननगर, विजापूर रोड, सोलापूर येथे अध्यक्ष श्री. पद्माकर कुलकर्णी यांचे अध्यक्षतेखाली झाली. अध्यक्षांनी शाखेचे कामकाज, भावी कामाचे नियोजन यांवर विचारमंथन व मार्गदर्शन केले. जयंत रायते यांनी आभार प्रदर्शन केले. या वार्षिक सर्वसाधारण सभेला उपाध्यक्ष प्रशांत जोशी, अमित कामतकर, श्रीकांत कुलकर्णी, रामचंद्र धर्मसाळे यांच्यासह सर्व कार्यकारिणी सदस्य व आजीव सदस्य हजर होते.

३. दि. १७/९/२०१७ : महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा जुळे सोलापूर आणि डॉ. पाटील परिवार, मोहोळ यांचे संयुक्त विद्यमाने डॉ. स्मिता पाटील, मोहोळ लिखित 'शोध सुखाचा' या ललितलेख संग्रहाचा प्रकाशन समारंभ रविवार दि. १७ सप्टेंबर २०१७ रोजी डॉ. निर्मलकुमार फडकुले सभागृहामध्ये महाराष्ट्र राज्याचे सहकार व पणन मंत्री मा. नामदार सुभाषबाबू देशमुख यांच्या शुभहस्ते, मसाप पुणे कार्याध्यक्ष मा. मिलिंद जोशी यांचे अध्यक्षतेखाली, मसाप पुणे प्रमुख कार्यवाह मा. प्रकाश पायगुडे तसेच प्रकाशिका तथा मसाप पुणेच्या कोषाध्यक्षा सौ. सुनिताराजे



अनुक्रमणिका

पवार यांच्या प्रमुख उपस्थितीत आयोजित केला होता. सोलापूर व मोहोळ येथील सामाजिक, वैद्यकीय, साहित्यिक आणि राजकीय क्षेत्रातील अनेक प्रतिष्ठित मान्यवर व साहित्यरसिक मोठ्या संख्येने हजर होते.

**४. दि. १०/१०/२०१७ :** महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा जुळे सोलापूर, प्रा. ए. डी. जोशी परिवार आणि इंडियन मॉडेल स्कूल परिवार यांच्या संयुक्त विद्यमाने ज्येष्ठ अभिनेत्री आशा शेलार यांचा हृद्य सत्कार करण्यात आला. 'होणार सून मी या घरची'मधील जान्हवीची आई आणि सायली जोशी व अमोल जोशी यांच्या 'खुलता कळी खुलेना' या 'झी' मराठी चॅनलवरील मालिकेत निर्मला आत्या या भूमिकांमधून आशा शेलार प्रसिद्धीस आल्या. त्यांच्या मुलाखतीमधून त्यांनी रसिकांच्या प्रश्नांना दिलखुलास उत्तरे दिली.

**५. दि. १६/१०/२०१७ :** महाराष्ट्र साहित्य पदिषद, शाखा जुळे सोलापूर आणि महिला व बालकल्याण समिती, मनपा सोलापूर यांच्या संयुक्त विद्यमाने खास दिवाळीचा आनंद द्विगुणित करण्यासाठी 'तरंग-शब्दसुरांचे' या मराठी काव्यवाचन आणि हिंदी, मराठी गाण्यांच्या सुरेल मैफिलीचे आयोजन 'प्रा. ए. डी. जोशी सभागृह' इंडियन मॉडेल स्कूल, जुळे सोलापूर या नव्या प्रशस्त सभागृहामध्ये सोमवार १६ ऑक्टोबर २०१७ वसुबारस या दिवशी सायंकाळी ५.३० वाजता केलेले होते. या कार्यक्रमाचे उद्घाटन मा. महापौर सौ. शोभा बनशेट्टी यांचे हस्ते, मा. प्रा. ए. डी. जोशी यांच्या अध्यक्षतेखाली तर प्रसिद्ध उद्योगपती व मसाप सोलापूरचे उपाध्यक्ष मा. दत्ताअण्णा सुरवसे यांच्या प्रमुख उपस्थितीत झाले. आकाशवाणी सोलापूरचे साहाय्यक संचालक सुनील शिनखेडे तसेच निरूपणकार सौ. स्नेहा शिनखेडे यांचे काव्यवाचन झाले. दिवाळीच्या पूर्वसंध्येला सर्वांनाच सुखावून आणि मनमुराद आनंद देऊन गेले.

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा फलटण

साहित्यिकांनी नुसते मनोरंजक लेखन न करता आपल्या भोवती घडणाऱ्या घटनांचे पडसाद साहित्यातून उमटवणे गरजेचे आहे. रसिकतेबरोबरच जगण्याचे भान साहित्यिकांनी ठेवावे, असे मत प्रसिद्ध वात्रटिकाकार व जागतिक मराठी अकादमीचे अध्यक्ष रामदास फुटाणे यांनी व्यक्त केले.

स्व. यशवंतराव चव्हाण स्मृतिदिनानिमित्त येथील श्रीराम एज्युकेशन सोसायटी, यशवंतराव चव्हाण स्मृती प्रतिष्ठान, सद्गुरू प्रतिष्ठान, महाराष्ट्र साहित्य परिषद, फलटण शाखा यांच्या संयुक्त विद्यमाने आयोजित सहाव्या यशवंतराव चव्हाण मराठी साहित्य संमेलनाचे रामदास फुटाणे अध्यक्ष होते. यावेळी महाराष्ट्र साहित्य परिषद पुणेचे प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे यांची प्रमुख उपस्थिती होती. व्यासपीठावर ज्येष्ठ लेखक प्रा. डॉ. आनंद पाटील, धन्वंतरी नागरी सहकारी पतसंस्थेचे संस्थापक चेअरमन डॉ. रवींद्र भोसले, संमेलनाचे स्वागताध्यक्ष दिलीपसिंह भोसले, म.सा.प. सातारा जिल्हा प्रतिनिधी रवींद्र बेडकिहाळ, यशवंतराव चव्हाण स्मृती प्रतिष्ठानचे अध्यक्ष दत्ताजीराव सूर्यवंशी बेडके, श्रीराम एज्युकेशन सोसायटीचे मानद सचिव सचिन सूर्यवंशी बेडके, उपाध्यक्ष, बापूसाहेब मोदी, म.सा.प. फलटण शाखा अध्यक्ष प्राचार्य रवींद्र येवले, मसाप सोलापूर शाखेचे अध्यक्ष पद्माकर कुलकर्णी, खंडाळा शाखा अध्यक्ष विलास वरे, सासवड शाखेचे अध्यक्ष रावसाहेब पवार, इस्लामपूर शाखेचे कार्यवाह डी. आर. सलगर आदी मान्यवर उपस्थित होते.

साहित्यिकांनी प्रेमाच्या कविता, काल्पनिक कथा रंगवण्यापेक्षा या विरोधात लिखाणाचे सामर्थ्य ठेवावे, साहित्यिकांचा अर्थकारणाचाही अभ्यास असावा. समकालीन परिस्थितीवर साहित्यिकांनी अधिक लिखाण करावे. ग्रामीण भागात साहित्यिक पोचणे गरजेचे आहे. त्यासाठी मसाप फलटणचा शिवार साहित्य संमेलने आयोजित करण्याचा उपक्रम अभिनंदनीय आहे. साहित्य संमेलनाचे स्वरूप बदलणे गरजेचे असून ती साहित्यिकांपुरतीच मर्यादित असावीत. या संमेलनांमधून साहित्यिकांमध्ये चर्चा व्हाव्यात. लेखणीला धार येण्यासाठी केवळ साहित्य मेळावे व्हावेत. लेखकाची अनुभूती, प्रज्ञा, प्रतिभा सकस कशी होईल यासाठीचा प्रयत्न अशा संमेलनांमधून करावा व ही जबाबदारी साहित्य संस्थांची आहे, असेही फुटाणे यांनी नमूद केले.

यावेळी रामदास फुटाणे यांच्या हस्ते मसाप फलटण शाखेतर्फे देण्यात येणारा 'यशवंतराव चव्हाण साहित्यिक गौरव पुरस्कार' कोल्हापूर येथे ज्येष्ठ साहित्यिक प्रा. डॉ. आनंद पाटील यांना तर मसाप खंडाळा शाखा पुरस्कृत 'यशवंतराव चव्हाण सहकार गौरव पुरस्कार' सातारा येथील धन्वंतरी नागरी सहकारी पतसंस्थेचे संस्थापक चेअरमन डॉ. रवींद्र भोसले यांना प्रदान करण्यात आला. रोख रु. ५०००/-, ग्रंथ, सन्मानपत्र, शाल असे या पुरस्कारांचे स्वरूप होते.

प्रारंभी रवींद्र बेडकिहाळ यांनी प्रास्ताविकात यशवंतराव चव्हाणांनी सांगितल्याप्रमाणे साहित्य संमेलने लोकाभिमुख व्हावीत या उद्देशाने गावागावात शिवार साहित्य संमेलनही आयोजित केले जात असल्याचे सांगितले.

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा कऱ्हाड

मसाप शाखा कऱ्हाडच्या वतीने डॉ. सुप्रिया दीक्षित लिखित 'कशेळी' या पुस्तकाचा प्रकाशन सोहळा आयोजित केला. मौज प्रकाशन गृह, मुंबई हे प्रकाशक असलेल्या या पुस्तकाचे प्रकाशन ज्येष्ठ साहित्यिक श्रीनिवास विनायक कुलकर्णी यांच्या हस्ते करण्यात आले.

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा : पलूस

कवी 'सुधांशु' यांच्या जन्मशताब्दी वर्षानिमित्त कवितेची निर्मितिप्रक्रिया व कविसंमेलन

महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा पलूस व सदानंद साहित्य मंडळ, औदुंबर यांच्या संयुक्त विद्यमाने कवी सुधांशु यांच्या जन्मशताब्दी वर्षानिमित्त तसेच सदानंद साहित्य मंडळ ७५व्या वर्षानिमित्त औदुंबर या ठिकाणी दि. २९।१०।२०१७ रोजी एकदिवसीय काव्यनिर्मितिप्रक्रिया व कविसंमेलन असा कार्यक्रम संपन्न झाला. या कार्यक्रमाचे प्रमुख पाहुणे सांगलीतील ज्येष्ठ साहित्यिक व समीक्षक प्रा. वैजनाथ महाजन हे होते.

प्रा. वैजनाथ महाजन यांनी कवी सुधांशुंच्या संदर्भातील अनेक आठवणी सांगितल्या व नवीन साहित्यिकांनी दर्जेदार साहित्याच्या निर्मितीसाठी वाचन, चिंतन, मनन यांची नितांत आवश्यकता असते या संबंधी विवेचन केले.

या वेळी दुसऱ्या सत्रात काव्यनिर्मितिप्रक्रिया या विषयावर परिसंवाद झाला. या परिसंवादाचे व कविसंमेलन अध्यक्ष मा. प्राचार्य डॉ. सयाजी मोकाशी हे होते. यात प्रा. प्रदीप पाटील, इस्लामपूर, वसंत केशव पाटील, सांगली, श्री. सुभाष कवडे यांनी कविता निर्मितीप्रक्रियेविषयी विवेचन केले. परिसंवादानंतर निमंत्रित कवींचे काव्यसंमेलन झाले. यात विविध भागांतून आलेल्या ३० कवींनी सहभाग घेतला.

---

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा : नाशिक रोड

**१) 'मराठी ज्ञानभाषा होण्यासाठी श्री. गिरीश कुबेर यांचे व्याख्यान व पुस्तक प्रकाशन सोहळा' :** ''मराठी भाषा समृद्ध आहे. ती ज्ञानभाषा देखील आहे. परंतु मराठी माणसात न्यूनगंड असल्यामुळे आपण ते मान्य करायला तयार नाही. इतर प्रांतांतील लोक त्यांच्याच मातृभाषेत एकमेकांशी बोलतात. पण आपण मात्र इंग्रजी बोलण्यात धन्यता मानतो. दारिद्र्य मराठीचे नव्हे, तर भाषेचे आहे.'' असे दै. लोकसत्ताचे संपादक श्री. गिरीश कुबेर यांनी प्रतिपादन केले.

यावेळी 'कथा अकलेच्या कायद्याची' या पुस्तकाचे प्रकाशन श्री. कुबेर यांच्या हस्ते करण्यात आले.

कार्यक्रमाचे अन्य प्रमुख अतिथी म्हणून राजहंस प्रकाशनाचे संपादक श्री. सदानंद बोरसे होते.

**२) संवाद सृजनांशी श्रीम. अरुणाताई कुलकर्णी :** ''जे वाचकांच्या सोबत जात नाही, ते साहित्यच नाही. साहित्याचा वाचकांशी थेट संवाद झाला तर ठीक, अन्यथा त्याच्याकडे रसिक वळूनही बघत नाहीत. मराठी साहित्य कसे असते याचे घडे मला बालपणीच मिळाले. म्हणून माझे साहित्य रसिकांना भावले'' असे प्रतिपादन संवाद सृजनाशी या मालिकेतील चौथे पुष्प गुंफतांना केले.

कार्यक्रमास जिल्हा न्या. श्री. प्रकाश कऱ्हाडकर, आयकर अधिकारी श्री. अनिल गुरव, गीतकार श्री. संतोष हुदलीकर आदी उपस्थित होते.

**३) दि. २४-१०-१७ :** महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा नाशिकरोड तर्फे आयोजित 'वाचन प्रेरणा दिन - २०१७' निमित्त परिसरातील प्रत्येक विद्यालयातील शालान्त परीक्षेत मराठी विषयात सर्वाधिक गुण मिळवणाऱ्या विद्यार्थ्यांच्या सत्काराप्रसंगी प्रमुख अतिथी म्हणून डॉ. उषाताई शिंदे उपस्थित होत्या.

**४) दि. २८-१०-१७ :** महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा नाशिकरोड तर्फे आयोजित 'संवाद सृजनांशी' या मालिकेतील ५वे पुष्प प्रा. मंजिरी पाटील यांनी गुंफले.

वयाच्या चाळिशीनंतर लिखाणास सुरुवात केल्यावर वृत्तपत्रांमधील लिखाण वाचकांनी उचलून धरल्याचे त्या म्हणाल्या. 'लग्नानंतर सात वर्षांनी मला लिहिण्याची परवानगी मिळाल्यावर वाचकांचे समुपदेशन करणाऱ्या सदरात मी जी उत्तरे देत गेले, त्यास प्रचंड प्रतिसाद मिळाला आणि मला देखील लिखाणात माझे ध्येय मिळाले. माझ्या अनुभवावरून सांगू इच्छिते की, कुठल्याही स्त्रीला कधीही लिखाण करता येणे सहज शक्य आहे, फक्त प्रयत्न हवे.'

---

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा डोंबिवली

साधारणतः ३५-४० वर्षांपूर्वी, डोंबिवलीतील ज्या ज्येष्ठ, बुजुर्ग रंगकर्मींनी आपल्या भूमिका गाजविल्या होत्या, त्याच भूमिकांचा पुन्हा एकदा रंगमंचीय आविष्कार डोंबिवलीकरांना पाहायला मिळाला; त्याचबरोबर प्रेक्षकांना नाट्यसाक्षर करण्यासाठी भरतमुनींच्या नाट्यशास्त्राचा परिचयदेखील करून देण्यात आला. अण्णासाहेब किर्लोस्कर, वि. वा. शिरवाडकर, वसंत कानेटकर, पु. ल. देशपांडे, दिलीप परदेशी, महेश एलकुंचवार, सतीश आळेकर, शेक्सपियर अशा अनेक दिग्गज नाटककारांच्या पल्लेदार वाक्यांना आणि काव्यात्मक संवादांना, स्वगतांना चंद्रकांत माने, मदन जोशी, उदय गोखले, विलास सुतावणे, प्रवीण मुश्रीफ, सुरेश सरदेसाई, सुधीर वैद्य, संजय रणदिवे, प्रफुल्ल पाटील, भारती ताम्हणकर, शैलेश चव्हाण, शिल्पा कुलकर्णी तसेच श्रावणी वाळिंबे आणि तनुश्री गीते या दोन बालसाहित्य कलाकारांनी



अनुक्रमणिका

अभिनीत केले. सर्वांचे अभिनय सुरेख होते. जुन्या नाटकातील साहित्य ऐकताना प्रेक्षक भारावून गेले.

अविनाश सोमण यांच्या अतिशय अभ्यासपूर्ण आणि सुंदर वाक्कौशल्यातून भरतमुनींच्या नाट्यशास्त्रावर भाष्य केले. रंगमंचाची रचना कशी असावी, त्याचे आकारमान कसे असावे, आयत, चतुरस्र आणि त्रिस्त्र रंगमंच म्हणजे काय, नेपथ्य कसे असावे, अशा प्रकारचे अत्यंत मौल्यवान मार्गदर्शन त्यांनी केले. उदय गोखले यांच्या नांदीने कार्यक्रमाची सुरुवात झाली. 'शाकुंतल', 'रायगड', 'महानिर्वाण', 'एक ओसाड गाव', 'अश्रूंची झाली फुले', 'निष्पाप', 'ती फुलराणी', 'इस्कोन ७८६' इ. नाटकातील साभिनय संवाद सादर झाले.

२) ५ नोव्हेंबर २०१७ रोजी, म्हणजेच रंगभूमीदिनी महाराष्ट्र साहित्य परिषद, डोंबिवली या संस्थेने अभिनेते आणि लेखक श्री. चिन्मय मांडलेकर यांच्या मुलाखतीचा कार्यक्रम आयोजित केला. मुलाखत ज्येष्ठ रंगकर्मी श्री. मदन जोशी यांनी घेतली.

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा : कल्याण

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कल्याण शाखेने आयोजित केलेल्या राज्यस्तरीय कथा लेखन स्पर्धेचा पारितोषिक वितरण समारंभ व 'वार्तासूत्र' दिवाळी विशेषांकाचा प्रकाशन सोहळा ज्येष्ठ समीक्षक कृष्णा किंबहुने व संपादक-समीक्षक नितीन रिंढे यांचे शुभ हस्ते पार पडला. मसापने आयोजित केलेल्या या राज्यस्तरीय कथा लेखन स्पर्धेसाठी संपूर्ण महाराष्ट्रातील १११ नवलेखकांनी सहभाग घेतला होता. त्या कथांचे परीक्षण प्रा. दिपा ठाणेकर व इक्बाल मुकादम यांनी केले असून डॉ. शि. बा. नाडकर्णी - मुंबई, स्नेहा ढोले - यवतमाळ, श्री. समीर जडये - डोंबिवली यांना प्रथम, द्वितीय, तृतीय पारितोषिके अनुक्रमे रुपये ३,०००/-, २,०००/-, १,०००/- तसेच स्मृतिचिन्ह, प्रमाणपत्र, पुष्पगुच्छ देऊन गौरविण्यात आले. उत्तेजनार्थ पारितोषिक सौ. वर्षा चौबे - चंद्रपूर, सौ. श्रद्धा वझे - कल्याण, सौ. अश्विनी सुर्वे - मुंबई, यांना तर विशेष उल्लेखनीय कथा म्हणून डॉ. विवेक वाकचौरे - पुणे, निलेश मालवणकर - मुंबई, डॉ. प्रेरणा सिंह - येवला, रवींद्र वाळिंबे - विरार, वैशाली पाठक-काटकर - मुंबई, कविता नवरे - डोंबिवली, सौ. ज्योती जाधव - नवी मुंबई, भि. द. उशीर यांना देण्यात आला.

या स्पर्धेसाठी दिल्लीमध्ये स्थायिक झालेल्या सौ. शुची वोरकर 'सीआरपीमधील जवान' जे सध्या उडीसा मध्ये कार्यरत आहेत, अशा अनेकांनी सहभाग घेतला होता. हे या स्पर्धेचे वैशिष्ट्ये म्हणावे लागेल. भिकू बारस्कर यांच्या संकल्पनेतून हा कार्यक्रम साकार झाला.

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा : शाहुपुरी

**आत्मप्रेरणेशी प्रामाणिक राहून लेखन करावे - विनया खडपेकर**

मसाप, शाहुपुरी शाखा आणि राजहंस प्रकाशनच्या वतीने आयोजित दोन दिवसीय लेखन शिबिराचे आयोजन करण्यात आले. लिहू इच्छिणाऱ्या, लिहिण्यास सुरुवात केलेल्या आणि लिहीत असलेल्यांसाठी मसाप, शाहुपुरी शाखा आणि राजहंस प्रकाशनच्यावतीने दोन दिवसीय लेखन शिबिराचे आयोजन करण्यात आले. या शिबिरात राजहंसचे संपादक आनंद हर्डीकर, विनया खडपेकर, करुणा गोखले, डॉ. सदानंद बोरसे यांनी मार्गदर्शन केले. शिबिरात एकूण ४ सत्रांत मार्गदर्शन करण्यात आले. प्रत्येकाच्या लेखनाचा बाज वेगळा असतो. कुणाला कविता करता येते, कोणी ललित लेखन करतो, कोण कादंबरी लिहू शकतो त्यामुळे लेखक होणाऱ्या प्रत्येकानेच आपल्याला साहित्यातील सगळेच प्रकार जमले पाहिजेत असा अट्टहास न करता जो प्रकार जमतो त्यावर मेहनत घेऊन लेखन करावे. झालेले लेखन व्यवस्थित ठेवावे, त्याचप्रमाणे स्वतः पुनर्वाचन करावे आणि नंतर इतरांना वाचण्यास द्यावे असे मार्गदर्शन राजहंसच्या साक्षेपी संपादकांनी केले. शिबिरात नगर, पुणे, मुंबई, सातारा, वाई, खंडाळा येथून २४ जण सहभागी झाले होते.

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा : दामाजीनगर

**१) १२ मे २०१७ :** मसाप दामाजीनगर शाखेचे व शाखेच्या कार्यालयाचे उद्घाटन मसाप पुणेचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांच्या शुभहस्ते, मंगळवेढ्याच्या नगराध्यक्षा सौ. अरुणा माळी यांचे अध्यक्षतेखाली झाले. याप्रसंगी मसाप पुणेचे प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे, कोषाध्यक्षा सुनिताराजे पवार, अ. भा. सा. महामंडळाचे कार्यकारणी सदस्य पद्माकर कुलकर्णी, कार्यकारणी सदस्य कल्याण शिंदे इ. मान्यवर उपस्थित होते. या प्रसंगी भव्य ग्रंथदिंडी काढण्यात आली.

शाखेने सुरू केलेल्या 'ई-पसायदान' या नियतकालिकाचे आणि मसाप दामाजीनगर शाखेच्या (http://mspdamajinagar.blogspot.in) ब्लॉग वेबसाईटचे आणि यू-ट्युब चॅनलचे (youtube>msp

damajinagar) प्रकाशन झाले.

**शाखा भेटी** - शाखेस डॉ. यशवंत पाटणे, शशिकांत लावणीस, विद्यासागर पाटंगणकर, श्रीनिवास नार्वेकर, अभिनेते वैभव मांगले, कवी अरुण म्हात्रे, प्रा. डॉ. अरुण शिंदे, प्रभाकर देशमुख, कृषीभूषण दादा बोडके या मान्यवरांनी भेट देऊन मार्गदर्शन केले.

**ई-साहित्य शाखेने खालील ई-साहित्य प्रकाशित केले :** ई-पसायदान - मे २०१७, ई-पसायदान - जून २०१७, ई-पसायदान - जुलै २०१७ (पाऊस कविता विशेषांक), ई-पसायदान - ऑगस्ट २०१७ (चारोळी विशेषांक), झिंगाट मन (चारोळी संग्रह) विठोबा सरगर, मराठी गौरवगीतांचे संकलन - प्रा. दत्ता सरगर

**२) १८ ते १९ फेब्रुवारी, २०१७ :** - सूत्रसंचालन कार्यशाळा - १८ व १९ फेब्रुवारी १७ रोजी दोन दिवसांची मोफत कार्यशाळा घेण्यात आली. तिला डॉ. उत्कर्षा नार्वेकर व श्रीनिवास नार्वेकर यांनी मार्गदर्शन केले. त्यात शिक्षण, युवक, राजकीय नेते असे २०८ जण सक्रिय सहभागी झाले.

**मराठी राजभाषा दिन – २७ फेब्रुवारी, १७ :** १) मराठी भाषेचे आम्हीच मारेकरी! या विषयावर परिसंवाद झाला. त्यात प्रा. विश्वनाथ ढेपे, प्रा. पठाण शिवशरण, बालाजी शिंदे, प्रा. दत्ता सरगर, सौ. रेखा जडे, सौ. सुधा मांडवे, दामोदर देशमुख, भारत शिंदे, अध्यक्ष कल्याण शिंदे सहभागी झाले.

२) कविसंमेलनात गोरक्ष जाधव, संगिता रसाळ, प्रा. दत्ता सरगर यांनी कविता सादर केल्या.

३) ज्ञानदीप विद्यालयात सुंदर मराठी हस्ताक्षर कार्यशाळा घेण्यात आली. मार्गदर्शन - यतिराज वाकळे.

४) मराठी भाषेला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा म्हणून तहसिलदार प्रदीप शेलार यांना मोर्चाने जाऊन आग्रही निवेदन दिले.

**३) १ मार्च, २०१७ : सौ.** संगिता मासाळ यांच्या 'बहर' या कविता संग्रहाचे प्रकाशन

**४) १९ ते २४ मे, २०१७ :** व्यक्तिमत्त्व विकास व अभिनय शिबिर - नाट्यपरिषदेच्या सहकार्याने १९ ते २४ मे या कालावधीत व्यक्तिमत्त्व विकास शिबिर घेण्यात आले. त्यात ३९ विद्यार्थी सहभागी झाले. त्यांना रंगभूमी कलावंत देवदत्त पाठक यांनी मार्गदर्शन केले.

**५) २४ जून, २०१७ :** कालिदास दिन - कवी कुलगुरू कालिदासाच्या भव्य प्रतिमेचे अनावरण दै. दामाजी एक्सप्रेसचे संपादक दिगंबर भगरे यांचे हस्ते झाले.

**६) २५ जून २०१७ :** श्री. धनंजय शंकर पाटील यांच्या 'दैव' कथासंग्रहाचा प्रकाशन समारंभ झाला.

**७) १६ जुलै २०१७ :** मंगळवेढ्यातील जुन्या पिढीतील कवींच्या आठवणींना उजाळा देण्यासाठी कै. लक्ष्मण दुघाळ, कै. ॲड. जगन्नाथ रत्नपारखी व कै. सुभाष शिकतोडे यांच्या कवितांचे सादरीकरण झाले.

**८) २१ ऑगस्ट २०१७ :** 'म. फुले यांचा सार्वजनिक सत्यधर्म आणि आजचे वास्तव' या विषयावर डॉ. अरुण शिंदे (कोल्हापूर) यांचे व्याख्यान झाले.

'गाणे गातो वारा, झेलीत पाऊसधारा' - या शीर्षकाखाली पंढरपूर येथे पाऊस कवितांचे वाचन करण्यात आले. त्यात गोरक्ष जाधव, दत्ता सरगर, प्रकाश जडे, संग्राम जाधव, संगीता मासाळ यांनी कविता सादर केल्या.

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा सोलापूर

**आसाराम लोमटे यांचे व्याख्यान :** महाराष्ट्र साहित्य परिषद, सोलापूर शाखेच्या वतीने साहित्य अकादमी पुरस्कार विजेते लेखक आसाराम लोमटे यांचे 'लेखक लिहितो कशासाठी?' या विषयावर व्याख्यान आयोजित करण्यात आले. कुठल्याही श्रेष्ठ निर्मितीच्या बुडाशी वेदना असते असे त्यांनी यावेळी सांगितले. यावेळी महामंडळाच्या संमेलनाच्या निवडसमितीवर निवड झाल्याप्रीत्यर्थ पद्माकर कुलकर्णी यांचा सत्कार करण्यात आला. या कार्यक्रमास डॉ. गो. मा. पवार, निशिकांत ठकार यांच्यासह बहुसंख्य साहित्यिक व साहित्यरसिक उपस्थित होते.

**सुरेखा शहा यांच्या पंचवीस पुस्तकांचे प्रकाशन :** महाराष्ट्र साहित्य परिषद, सोलापूर शाखा व अरिहंत पब्लिकेशन, पुणे व शाखेच्या संयुक्त विद्यमाने ज्येष्ठ लेखिका सुरेखा शहा यांच्या विविध वाङ्मयप्रकारांतील पंचवीस पुस्तकांचे प्रकाशन करण्यात आले. प्रमुख पाहुणे प्रदीप निफाडकर यांनी आपले विचार व्यक्त केले. एकाच वेळी, एकाच मंचावर, एकाच लेखिकेची पंचवीस पुस्तके प्रकाशित होणे ही घटना अद्वितीय असून गिनीज बुक वर्ल्ड रेकॉर्ड, लिमका बुक ऑफ वर्ल्ड रेकॉर्ड, 'युआरएफ' बुक ऑफ वर्ल्ड रेकॉर्डसाठी प्रस्ताव संबंधित नोंद घेणाऱ्या परीक्षकांकडून गेला आहे. या कार्यक्रमास बहुसंख्येने साहित्य-रसिक उपस्थित होते.

**'श्रावणधारा' काव्यस्पर्धेचे आयोजन :** महाराष्ट्र साहित्य परिषद, सोलापूर शाखा-सोलापूरचे वतीने मंगळवेढेकर इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी, सोलापूर येथे 'श्रावणधारा' (पर्व दुसरे) हा काव्यस्पर्धेचा कार्यक्रम संपन्न झाला. युवकांसाठी आयोजित केलेल्या या स्पर्धेचे उद्घाटन कार्यक्रमाचे प्रास्ताविक मसाप युवा मंच प्रमुख प्रा. नरेंद्र काटीकर यांनी केले. काव्यस्पर्धेचे उद्घाटन शिक्षण संचालक डॉ. सतीश देशपांडे, उच्च माध्यमिक शिक्षण पर्यवेक्षक सूर्यकांत सुतार व परिषदेचे अध्यक्ष डॉ. सुहास पुजारी यांचे हस्ते काव्यज्योत प्रज्वलित करून झाले.

ही स्पर्धा पाच गटांत आयोजित करण्यात आलेली होती. 'पाऊस', 'नातीगोती' व 'दुष्काळ' हे विषय देण्यात आले होते.

प्रत्येक गटात प्रथम रु. ५००/-, द्वितीय रु. ३००/-, तृतीय रु. २००/- व उत्तेजनार्थ दोन बक्षिसे देण्यात येणार आहेत. या काव्यस्पर्धेत ३५० युवा स्पर्धकांनी भाग घेतला होता. प्रत्येकाला सहभाग प्रमाणपत्र देण्यात आले. परीक्षक म्हणून कवी माधव पवार, बदीउज्जमा बिराजदार, गोविंद काळे, गिरीश दुनाखे, अरुण नवले, डॉ. राजदत्त रासोलगीकर, वंदना कुलकर्णी, विद्या कुलकर्णी, शोभना सागर, वैशाली अघोर आदींनी काम पाहिले.

हे कार्यक्रम यशस्वी होण्यासाठी परिषदेचे अध्यक्ष डॉ. सुहास पुजारी, उपाध्यक्ष दत्ताअण्णा सुरवसे, कार्याध्यक्ष ॲड. जे. जे. कुलकर्णी, कार्यवाह बाबुराव मैंदर्गीकर, मारुती कटकधोंड, कोषाध्यक्ष बदीउज्जमा बिराजदार, प्रसिद्धी प्रमुख राजेंद्र भोसले, युवा विभाग प्रमुख नरेंद्र काटीकर आदी पदाधिकाऱ्यांनी विशेष परिश्रम घेतले.

## महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे मुख्य शाखा कार्यवृत्त

**१) दि. ८ सप्टेंबर २०१७ :** 'लेखक तुमच्या भेटीला' या उपक्रमांतर्गत डॉ. अरुणा ढेरे यांनी हुजुरपागा शाळेतल्या विद्यार्थिनींशी संवाद साधला. सुमारे दीड ते पावणे दोन तास ही भेट रंगली. यावेळी शाळेच्या मुख्याध्यापिका सीमा झोडगे, उपमुख्याध्यापिका मंगला वाघमोडे, हेमा भूमकर आदी उपस्थित होते. काही विद्यार्थिनींनी स्वरचित कविता सादर केल्या.

**२) दि. १८ सप्टेंबर २०१७ :** सत्कार समारंभ : परिषदेचे विश्वस्त आणि साहित्यिक मा. यशवंतराव गडाख यांचा अमृतमहोत्सवानिमित्त जाहीर सत्कार झाला. डॉ. सदानंद मोरे व विश्वस्त मा. उल्हासदादा पवार हे उपस्थित होते. डॉ. मोरे यांच्या हस्ते शाल, श्रीफळ व गुच्छ श्री. गडाख यांना देण्यात आला. त्याचबरोबर सौ. गडाख यांचाही सत्कार करण्यात आला. समारंभास नगर व पुणे जिल्ह्यातील श्री. गडाख यांच्या चाहत्यांची लक्षणीय उपस्थिती होती.

**३) दि. २० सप्टेंबर २०१७ :** मसाप आयोजित पहिले बालकुमार साहित्य संमेलन : लोणावळा येथील मन:शक्ती केंद्र व मसाप यांच्या संयुक्त विद्यमाने डॉ. अनिल अवचट यांच्या अध्यक्षतेखाली पार पडले. संपूर्ण दिवसभर लोणावळा शहर व परिसरातील ६ शाळांचे सुमारे ३०० ते ३५० विद्यार्थ्यांचा उत्साही सहभाग व 'मी मराठीच बोलेन, मराठी सही करीन' अशा काहीशा शब्दांत विद्यार्थ्यांनी आवाजी मतदानाने पास केलेला ठराव हे या संमेलनाचे वैशिष्ट्य ठरले.

डॉ. संगीता बर्वे, आदित्य दवणे, आश्लेषा महाजन यांनी 'लेखनाची आनंदवाट' ही लेखन कार्यशाळा अभिनव रीतीने घेतली. 'आम्हालाही काही सांगायचंय' या कार्यक्रमात विविध शाळेतल्या बालकुमारांनी लिहिलेल्या कथा, कविता, लेख सादर केले. सर्व बालकुमारांना मन:शक्ती केंद्राचा 'पंख मनाचे रंग क्षणांचे' ही दिवाळी अंक भेट देण्यात आला.

**४) दि. २२ सप्टेंबर २०१७ :** 'कविता दुर्गेच्या' या खास निमंत्रित कवयित्रींच्या कविसंमेलनात डॉ. स्नेहसुधा कुलकर्णी, स्वाती सामक, अंजली कुलकर्णी, ज्योत्स्ना चांदगुडे, प्रभा सोनावणे, डॉ. संगीता बर्वे, प्राजक्ता ढेरे, अनुराधा काळे, आश्लेषा महाजन, सुप्रिया जाधव, मृणालिनी कानिटकर-जोशी, कविता क्षीरसागर, माधुरी गयावळ, वैशाली मोहिते, हर्षदा सौरभ, संध्या वाघ, आरती देवगावकर, प्रतिभा पवार, मीनाक्षी नवले, तनुजा चव्हाण, चिन्मयी चिटणीस यांनी सहभाग घेतला. मसाप आणि साहित्य दीप यांच्या संयुक्त विद्यमाने नवरात्री निमित्त हे खास कविसंमेलन गझलकार व उपजिल्हा निवडणूक अधिकारी मा. मोनिका सिंग यांच्या प्रमुख उपस्थितीत पार पडले.

**५) दि. २४ सप्टेंबर २०१७ :** लेखन कार्यशाळा : मसाप व साहित्यसेतू यांच्या संयुक्त विद्यमाने सदरहू कार्यशाळा आयोजित करण्यात आली. ॲड. भास्करराव आव्हाड यांच्या हस्ते कार्यशाळेचे उद्‌घाटन झाले. कार्यशाळेचे मार्गदर्शक म्हणून विवेक वेलणकर, रवींद्र गुर्जर, अनिल कुलकर्णी, प्रा. क्षितिज पाटुकले, भालचंद्र कुलकर्णी यांनी विविध विषयांना अनुलक्षून आपला विषय मांडला.

**६) दि. २५ सप्टेंबर २०१७ :** 'एक कवी एक कवयित्री' या उपक्रमात या खेपेस प्रा. डॉ. दासू वैद्य व अंजली कुलकर्णी यांनी प्रथम कविता वाचन केले व नंतर प्रमोद आडकर, उद्धव कानडे यांनी त्यांची मुलाखत घेतली.

**७) दि. २८ सप्टेंबर २०१७ :** शिरीष पै व अरुण साधू यांना श्रद्धांजली सभा : डॉ. श्रीपाल सबनीस यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या श्रद्धांजली सभेत बाबूराव कानडे, विजय कोलते, उज्ज्वला बर्वे, रामदास फुटाणे, अरुण जाखडे, डॉ. एस. एस. भोसले यांची श्रद्धांजलीपर भाषणे झाली.

**८) दि. ५ ऑक्टोबर २०१७ :** कोजागिरीनिमित्त स्नेहमेळावा व दुग्धपान : कोजागिरीनिमित्त हितचिंतक, कवी, लेखक, विविध क्षेत्रातले मान्यवर, कलाकार उपस्थित होते. 'आम्ही एकपात्री'चे संतोष चोरडिया, वंदन राम नगरकर, मोनिका जोशी-बर्वे, भारत देसडला, राजन लाखे, रामदास फुटाणे यांनी गाणी किस्से सादर केले. उपस्थितांनी अल्पोपाहार व दुग्धपानाचा आस्वाद घेतला.

**९) दि. ६ ऑक्टोबर २०१७ :** कै. द. वा. पोतदार स्मृतिपुरस्कार समारंभ : मा. डॉ. उत्तमराव भोईटे यांच्या हस्ते यंदा कै. महामहोपाध्याय द. वा. पोतदार स्मृति पुरस्कार डॉ. सचिन पोवार यांच्या 'शिवछत्रपतींचे शिलेदार' या संशोधनात्मक ग्रंथास सन्मानपूर्वक देण्यात आला. सुहासिनी देशपांडे व सुवर्णा निंबाळकर यांनी परीक्षक म्हणून काम केले.

**१०) दि.११ ऑक्टोबर ते १४ ऑक्टोबर २०१७ :** पुणे बुक फेअर व मसाप संयुक्त विद्यमाने प्रदर्शनानिमित्त साहित्यिक कार्यक्रम : पुण्यातील गणेश क्रीडा केंद्रात दरवर्षी प्रमाणे ग्रंथ प्रदर्शन व विक्री उपक्रमांतर्गत पुणे बुक फेअर व मसापच्या संयुक्त विद्यमाने होणाऱ्या साहित्यिक कार्यक्रमात दि. ११ ऑक्टोबर २०१७ : रोजी मा. नामदार श्री. दिवाकर रावते. महाराष्ट्र राज्य परिवहन मंत्री व पुण्याच्या महापौर मा. मुक्ता टिळक आणि

सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठाचे कुलगुरू मा. डॉ. नितीन करमळकर यांच्या उपस्थितीत प्रदर्शनाचे उद्घाटन झाले. यावेळी पुणे बुक फेअरचे पीएनआर राजन, मसापचे प्रा. मिलिंद जोशी, प्रकाश पायगुडे, सुनीताराजे पवार, दीपक करंदीकर व अनिल गोरे उपस्थित होते.

**१२) दि. १२ ऑक्टोबर २०१७ :** रोजी मराठा चेंबरच्या सभागृहात लेखक वाचक मेळावा काव्यशिल्प, पुणे आयोजित कवी संमेलन व मसाप आयोजित नवोदितांचे खुले कवी संमेलन झाले. लेखक वाचक मेळाव्यात डॉ. सुधीर राशींगकर, मधुसूदन घाणेकर, सुधाकर जोशी यांनी वाचकांशी संवाद साधला. अध्यक्ष मिलिंद सुधाकर जोशी, पीएनआर राजन उपस्थित होते. या कविसंमेलनात काव्यशिल्पच्या सुमारे १५ कवींनी सहभाग घेतला. व त्यानंतर मसाप आयोजित खुल्या कविसंमेलनात सूत्रसंचालन कवी दीपक करंदीकर यांनी केले.

**१३) दि. १३ ऑक्टोबर २०१७ :** शांता शेळकेंच्या साहित्यावर आधारित 'जीवन गाणे' हा सांगीतिक कार्यक्रम स्नेहल दामले आणि चैत्राली अभ्यंकर यांनी 'गोल्डन मेमरीज' तर्फे सादर केला.

**१४) दि. १४ ऑक्टोबर २०१७ :** एकपात्री कलाकार परिषद प्रस्तुत 'दमदार दमा' हा ज्येष्ठ लेखक द. मा. मिरासदार यांच्या गाजलेल्या विनोदी कथांवर आधारित कथाकथनाचा बहारदार कार्यक्रम केला. संस्थेचे कथाकथनकार मकरंद टिल्लू, अशोक मुरुडकर, विश्वास पटवर्धन, अरुण पटवर्धन यांनी एकापाठोपाठ एक मिरासदारांच्या कथा सादर केल्या.

**१५) दि. ८ ऑक्टोबर २०१७ : श्रद्धांजली सभा :** ज्येष्ठ कथालेखक ह. मो. मराठे यांना श्रद्धांजली वाहण्यासाठी सभा आयोजित करण्यात आली.

**१६) दि. ३० ऑक्टोबर २०१७ :** ज्ञानपीठ पुरस्कार विजेते कविश्रेष्ठ विंदा करंदीकर यांच्या जन्मशताब्दी वर्षानिमित्त 'देणाऱ्याने देत जावे' हा विंदा करंदीकरांच्या कवितांवर आधारित कार्यक्रम अक्षरधारा व साहित्य परिषद यांच्या संयुक्त विद्यमाने टिळक स्मारक मंदिरात आयोजित केला होता. श्रोत्यांची तुडुंब गर्दी या कार्यक्रमाला लाभली. यावेळी विंदांच्या कन्या जयश्री काळे, परचुरे प्रकाशनाचे राजाभाऊ परचुरे, डॉ. अरुणा ढेरे, डॉ. गिरीश ओक, अनुराधा मराठे, वंदना बोकील-कुलकर्णी, रसिका राठिवडेकर, प्रा. मिलिंद जोशी, प्रकाश पायगुडे, सुनीताराजे पवार, उद्धव कानडे हे मान्यवर उपस्थित होते. डॉ. अरुणा ढेरे यांच्या संहिता लेखनाचे अभिवाचन वंदना बोकिल-कुलकर्णी, अनुराधा मराठे आणि डॉ. गिरीश ओक यांनी केले.

**१७) दि. १ नोव्हेंबर २०१७ :** कै. योगिनी जोगळेकर स्मृतिदिन : या निमित्ताने निमंत्रित कवींचे कविसंमेलन झाले. मनोहर सोनवणे, धर्मराज निमसरकर, मधुसूदन घाणेकर, जयंत भिडे, कविता क्षीरसागर, प्रा. वर्षा तोडमल, मृणालिनी कानिटकर-जोशी, सुधीर कुबेर, अशोक भांबुरे, रुपाली अवचरे, दीप्ती आसवडेकर, प्रांजला धडफळे यांनी कवी संमेलनात भाग घेतला.

**१८) दि. ७ नोव्हेंबर २०१७ :** पु. ल. देशपांडे स्मृतिदिन पूर्वसंध्या : मसाप आणि आम्ही एकपात्री यांच्या संयुक्त विद्यमाने बंडा जोशी, उज्ज्वला कुलकर्णी, वंदन नगरकर व संतोष चोरडिया यांनी एकपात्री कार्यक्रम सादर केले. पुलंचे विनोद उलगडून सांगणारे भाषण कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांनी दिले.

**१९) दि. ८ नोव्हेंबर २०१७ :** 'मसाप गप्पा' या उपक्रमांतर्गत प्रसिद्ध लेखक श्याम मनोहर यांची मुलाखत मनोहर सोनवणे व प्रा. अतुल फडके यांनी घेतली.

**२०) दि. ११ नोव्हेंबर २०१७ :** पुलोत्सव : महाराष्ट्र साहित्य परिषद आणि आशय सांस्कृतिक यांच्या संयुक्त विद्यमाने 'चार संपादक' या विषयावर परिसंवाद झाला. दिलीप पाडगांवकर, गोविंद तळवलकर, अरुण साधू व ह. मो. मराठे या चार संपादकांच्या योगदानाचा आढावा घेणाऱ्या परिसंवादात रविमुकुल, राजीव खांडेकर, आनंद आगाशे व दिनकर गांगल यांनी आपले विचार मांडले.

**२१) दि. १३ नोव्हेंबर २०१७ :** 'लेखक तुमच्या भेटीला' या उपक्रमांतर्गत लेखिका इंदुमती जोंधळे यांनी नूतन मराठी विद्यालयाच्या विद्यार्थ्यांशी संवाद साधला.

**२२) दि. २१ नोव्हेंबर २०१७ :** अहिताग्नी राजवाडे स्मृती व्याख्यान : डॉ. श्री. मा. भावे यांचे 'तपस्वी अग्निहोत्री राजवाडे' या विषयावर व्याख्यान झाले. भारत इतिहास संशोधक मंडळाच्या अध्यक्षपदी नुकतीच निवड झाल्यानिमित्त डॉ. भावे यांचा शाल, श्रीफळ व गुच्छ देऊन कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांच्या हस्ते हृद्य सत्कार करण्यात आला. याप्रसंगी बालसाहित्यकार भा. रा. भागवत व लीलावती भागवत यांच्या साहित्यावर डॉक्टरेट केलेल्या अभिनव शाळेच्या माजी मुख्याध्यापिका डॉ. नीला धडफळे यांचा हा डॉक्टरेटचा प्रबंध-ग्रंथ डॉ. भावे यांच्या हस्ते कार्याध्यक्ष प्रा. जोशी यांना भेट देण्यात आला. तसेच महाराष्ट्र शासनाचा आण्णासाहेब किर्लोस्कर नाट्य जीवनगौरव पुरस्कार नुकताच मिळालेल्या संगीत रंगभूमीवरील ज्येष्ठ रंगकर्मी निर्मला गोगटे यांचा परिषदेतर्फे सत्कार करण्यात आला. राजवाडे कुटुंबीयांपैकी शैला मुकुंद यांनी मनोगत व्यक्त केले.

**२४) दि. २८ नोव्हेंबर २०१७ :** म. फुले पुण्यतिथीनिमित्त : कवी संमेलन महाराष्ट्र साहित्य परिषद, अक्षरभारती व मसाप विश्रांतवाडी शाखा यांच्या संयुक्त विद्यमाने म. फुले अभिवादन कविसंमेलनाचे आयोजन उद्धव कानडे यांच्या अध्यक्षतेखाली झाले. यावेळी डॉ. अविनाश सांगोलेकर उपस्थित होते. रुपाली अवचरे यांनी सूत्रसंचालन केले. कविसंमेलनात बंडा जोशी, ज्योत्स्ना चांदगुडे, वि. दा. पिंगळे, विश्वास गांगुर्डे, धनंजय तळवळकर, विनोद आष्टूळ, महेंद्रकुमार गायकवाड, चैतन्य डुंबरे, रमेश जाधव, सुरेश गायकवाड, सुरेश पाटोळे, सागर काकडे, श्रीकृष्ण शाळीग्राम, प्रल्हाद जाधव आणि दीपक करंदीकर यांनी कविता सादर केल्या.

(कार्यवृत्तात आलेल्या सर्व कार्यक्रमांचे प्रास्ताविक, परिचय, आभार, सूत्रसंचालन ही कामे प्रा. मिलिंद जोशी, प्रकाश पायगुडे, सुनिताराजे पवार, दीपक करंदीकर, बंडा जोशी, उद्धव कानडे, वि. दा. पिंगळे, प्रमोद आडकर, माधव राजगुरू यांनी केली.)

# धुवाधार पावसात रंगला साहित्याचा उत्सव





बालकुमार साहित्य संमेलनाचे उद्घाटन करताना संमेलनाध्यक्ष डॉ. अनिल अवचट (डावीकडून) सुनिताराजे पवार, प्रकाश पायगुडे, प्रा. मिलिंद जोशी, राजीव तांबे, डॉ. संगीता बर्वे, आश्लेषा महाजन आणि राजन लाखे आदी. समोर उपस्थित बालकुमार.

## 'मसाप'तर्फे 'पहिले बालकुमार साहित्य संमेलन' संपन्न

बाहेर कोसळणारा धुवाधार पाऊस, सभोवतीचा हिरवागार निसर्ग, आपल्या लयीत कोसळणारे सुंदर धबधबे आणि सभागृहात कोसळणारा शब्दांचा पाऊस अशा मनोहारी वातावरणात मनःशक्ती प्रयोग केंद्राच्या परिसरात बालकुमारांनी हशा आणि टाळ्यांच्या साथीने, साहित्याचा मनमुराद आनंद लुटला. निमित्त होते महाराष्ट्र साहित्य परिषद आणि मनःशक्ती केंद्र लोणावळा यांच्या संयुक्त विद्यमाने आयोजित लोणावळ्यातील पहिल्या बालकुमार साहित्य संमेलनाचे. संमेलनाच्या प्रारंभी मुलांनी लेझीम आणि ढोलताशांच्या गजरात काढलेली ग्रंथदिंडी आणि सादर केलेले मराठी अभिमान गीत यांमुळे निर्माण झालेल्या वेगळ्या माहोलात कधी गोष्टी सांगत, तर कधी ओरिगामी करत, कागदांचा उडणारा पक्षी दाखवत तर कधी दोऱ्यांची गंमत दाखवत, कधी रुमालाच्या साहाय्याने अनेक वस्तू तयार करण्याची करामत दाखवत, तर कधी कविता आणि गाणी म्हणत डॉ. अनिल अवचट यांनी मुलांशी एकरूप होत थेट संवाद साधला आणि या संवादात मुलेही रमून गेली.

आपले विचार आपल्या शब्दांत लिहा. कुणाचेही अनुकरण करू नका. माझा कागद आणि माझा पेन यांच्यात कोणीही येता कामा नये, असे स्वतःला आणि इतरांना सांगा. लिहिणं हे स्वतःशी बोलणंच असतं, अशा शब्दांत बालकुमार साहित्य संमेलनाचे अध्यक्ष डॉ. अनिल अवचट यांनी विद्यार्थ्यांना मार्गदर्शन केले. या वेळी व्यासपीठावर महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी, प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे, कोषाध्यक्ष सुनिताराजे पवार, मनःशक्ती केंद्राचे विश्वस्त, प्रमोदभाई शिंदे, कार्यकारी विश्वस्त प्रल्हाद बापर्डेकर, विश्वस्त व संशोधन प्रमुख गजानन केळकर, बालसाहित्यकार राजीव तांबे, कवयित्री संगीता बर्वे, आश्लेषा महाजन, आदित्य दवणे, राजन लाखे, माधव राजगुरू, दीपक करंदीकर, वि. दा. पिंगळे उपस्थित होते. अवचट म्हणाले, फँटसीला कमी समजू नका किंवा वेडेपणाही मानू नका. त्यातून खूप काही निर्माण करता येऊ शकते. कला ही मन रमवणारी गोष्ट आहे. विशाल मन असेल तर इतरांच्या सुखदुःखात सामील होता येते. माणुसकीची संस्कृती साहित्याच्या माध्यमातूनच निर्माण होऊ शकते. मुले ही निसर्गाची शुद्ध रूपं आहेत. समाजाच्या सहवासात येताना त्यांचे व्यक्तिमत्त्व गढूळ होणार नाही, याची काळजी घेणे गरजेचे आहे.

प्रा. जोशी म्हणाले, ज्यांच्या खांद्यावर उद्याच्या साहित्य-संस्कृतीची पालखी आहे, असे बालकुमार साहित्याच्या आनंदापासून वंचित राहू नयेत, यासाठी बालकुमार साहित्य संमेलने आयोजित करण्याचे साहित्य परिषदेने ठरविले आहे. तंत्रज्ञानाच्या युगात मुलांचे भावनिक भरण पोषण करण्यासाठी साहित्याची नितांत आवश्यकता आहे. प्रमोद शिंदे म्हणाले, मनःशक्ती केंद्राने नेहमीच मुलांचे व्यक्तिमत्त्व बहुआयामी होण्यासाठी विविध उपक्रमांचे आयोजन केले आहे. साहित्य संमेलनाच्या माध्यमातून ही मुले साहित्याशी जोडली जावीत, हा संमेलनाचा हेतू आहे. डॉ. वर्षा तोडमल यांनी सूत्रसंचालन केले. प्रकाश पायगुडे यांनी आभार मानले.

## महाराष्ट्र साहित्य परिषद
# पुस्तक सूची

**२५टक्के सवलतीत!**

### सूची

| | |
|---|---|
| मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड १ : | रु. ५००/- |
| मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड २ (भाग१) : | रु. ७००/- |
| मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड २ (भाग२) : | रु. ७००/- |
| मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ३ : | रु. ३५०/- |
| मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ४ : | रु. ४००/- |
| मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ५ (भाग १) : | रु. ३५०/- |
| मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ५ (भाग २) : | रु. ३५०/- |
| मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ६ (भाग १) : | रु. ३५०/- |
| मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ६ (भाग २) : | रु. ३००/- |
| मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ७ (भाग १) : | रु. ७००/- |
| मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ७ (भाग २) : | रु. ८००/- |
| मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ७ (भाग ३) : | रु. ७००/- |
| मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ७ (भाग ४) : | रु. ७००/- |
| भारतीय भाषांतील स्त्रीवादी साहित्य : | रु. ८००/- |
| भाषा व साहित्य संशोधन खंड १ : | रु. ५००/- |
| भाषा व साहित्य संशोधन खंड २ : | रु. ३००/- |
| भाषा व साहित्य संशोधन खंड ३ : | रु. २००/- |
| म.सा.पत्रिका लेख-सूची : | रु. ४००/- |

**डिमांड ड्राफ्टने आगाऊ पाठविल्यास संपूर्ण संच** आमच्या खर्चाने रेल्वे अगर एस. टी. पार्सलने पाठवू. (वरील संचातील सुटे भाग हवे असल्यास ग्रंथविक्रेत्यांना २५ टक्के सूट. व्यक्तिगत ग्राहकांना व संस्थांना १५ टक्के सूट. टपालखर्च वेगळा.)

मराठी वाङ्मयाचा इतिहास
खंड सातवा : १९५० ते २००० भाग तिसरा

मराठी वाङ्मयाचा इतिहास
खंड सातवा : १९५० ते २००० भाग चौथा

महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

मागणीसाठी संपर्क : **महाराष्ट्र साहित्य परिषद**, टिळक रस्ता, पुणे - ४११ ०३०. दूरभाष : ०२०- २४४७५९६३/६

बुक-पोस्ट

प्रेषक
प्रमुख कार्यवा...
महाराष्ट्र साहित्य प...
टिळक रस्ता, पुणे - . ०३०.
दूरभाष : ०२०- ...९६३

Maharashtra Sahitya Patrika. Quarterly : December 2017
Registered with the Register of Newspaper for India under No. 6398/57
Book Pkt. Periodical Category

अनुक्रमणिका




